# शेजारी पाजारी

के. पां. परांजपे



प्रकाशन क्रमांक ३८

ग. पां. परचुरे प्रकाशन मन्दिर मुंबई ४

मूल्य दीड रुपया

प्रकाशक
ग. पां. परचुरे
ग. पां. परचुरे
प्रकाशन
मन्दिर
गोरेगांवकर
चाळ क्र. २
गिरगांव
मुंबई ४

प्रथमावृत्ति
१९५०



मुखपृष्ठ
सजावट
चित्रकार
मुळगांवकर

मुद्रक
वि. पु. भागवत
मौज प्रिंटिंग
ब्यूरो
गिरगांव
मुंबई ४

## महत्त्वाची जाणीव

ह्या नाटकाचा प्रयोग लेखकाची आगाऊ लेखी परवानगी घेतल्याशिवाय, कोणीही, केव्हांही व कोठेंही करूं नये. ह्या नियमाचें उल्लंघन करणारावर, कायदेशीर इलाज केला जाईल.

**के. पां. परांजपे**

पत्रव्यवहाराचा पत्ता—
के. पां. परांजपे
श्रीराम मंदिर (चौपाटी बँडस्टँड जवळ)
सिरी रोड, मुंबई ६

## अर्पण पत्रिका—

झांशीची राणी, भगवा झेंडा, वीर नेताजी, धर्मवीर संभाजी, अटकेपार इत्यादि लोकप्रिय नाटकांचे कर्ते आणि सुंदर संगीत मंडळीचे मालक **श्री. गणेश कृष्ण बोडस**



ह्यांच्या साहचर्यामुळें मला नाटक लिहिण्याची स्फूर्ति झाली. तेव्हां माझें 'शेजारी पाजारी' हें प्रथम नाटक मी त्यांना सादर अर्पण केलें आहे.

**के. पां. परांजपे**

# कल्पनेचा उगम आणि तिची पूर्तता

ऑक्टोबर १९४१ मधील गोष्ट; दुसरं जागतिक युद्ध सुरू होऊन दोन वर्षें झालीं होतीं. मी त्यावेळीं ' सुंदर संगीत नाटक मंडळी ' मध्यें होतों. मंडळीचा मुक्काम कोल्हापूरला पॅलेस थिएटरांत होता. युद्धाची झळ आम्हांला चांगलीच जाणवूं लागली होती. नाटकांचें उत्पन्न अजिबात पडलं होतं आणि त्याचा व्हायचा तोच परिणाम होऊं लागला होता—एकेक नट मंडळींतून जाऊं लागला होता, आणि त्यामुळें कोणतंही नाटक लावणं आम्हांला कठीण पडूं लागलं होतं. तथापि कांहीं झालं तरी आम्हीं चार नट मात्र, शेवटपर्यंत टिकून राहाणार होतों. तव्हां चारच पात्रें असलेलें एखादें सुंदर नाटक आम्हांला पाहिजे होतं. इतक्यांत, कर्मधर्मसंयोगानें, सह्याद्रि मासिकाचा, नोव्हेंबर १९३८ चा अंक माझ्या वाचनांत आला व त्यांतील श्री. पां. गो. लोहोकरे ह्यांच्या ' खूप केलीत पंत ' ह्या लघुकथेनं माझं मन आकर्षून घेतलें. ' शेजारी पाजारी ' नाटकाची मध्यवर्ती कल्पना मला त्या कथेवरून सुचली आणि मी हें चार पात्रांचें नाटक लिहिलें. ह्या नाटकाचा प्रथम प्रयोग, सुंदर संगीत मंडळीनं, देवरूख ( जि. रत्नागिरी ) येथें १९४२ च्या फेब्रुवारींत केला. परंतु १९४२ च्या आंदोलनाचे वेळीं ती मंडळी बंद झाली आणि हें नाटक मुंबईच्या रंगभूमीवर आणण्याची माझी इच्छा अपूर्ण राहिली.

त्या माझ्या इच्छेची, आठ वर्षांच्या कालावधीनंतर–म्हणजे ता. १ जानेवारी १९५० रोजीं पूर्तता झाली आणि म्हणून ज्यांनीं ज्यांनीं मला साहाय्य केलें, त्या सर्वांचे आभार मानणें, माझें कर्तव्यच ठरतें. ह्या नाटकाची मध्यवर्ती कल्पना, 'खूप केलीत पंत' ह्या श्री. पां. गो. लोहोकरे ह्यांच्या लघुकथेवरून सुचली. नाटक लिहीत असतांना, श्री. रा. ग. कृ. बोडस व सौ. सरस्वतीबाई बोडस ह्यांनीं मला बहुमोल सूचना दिल्या. नाटक मुंबईच्या रंगभूमीवर आणण्यासाठीं, माझे जिवलग मित्र श्री. विष्णुपंत वैशंपायन व श्री. वसंतराव कुळकर्णी, ह्यांनीं अविश्रांत श्रम केले. नाट्यमंदिरच्या चालक सौ. विमलाबाई घैसास व सौ. विजया देसाई ह्यांनीं आपुलकीनें मदत केली. माझे मित्र मास्टर सुरेश हळदणकर ह्यांनीं जिवापाड मेहनत घेऊन, गाण्यांना भावमधुर चाली दिल्या. नाटकांतील एकमेव, परंतु अत्यंत आवश्यक असलेला देखावा, श्रीनंद नाट्यगृह (दादर) चे मालक श्री. रा. भांडारे ह्यांनीं अत्यंत थोड्या अवकाशांत, विनामूल्य करून दिला. ह्या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहें.

माझ्या सारख्या अप्रसिद्ध लेखकाचें, हें पहिलेंच नाटक छापण्याची धडाडी दाखविल्याबद्दल, ग. पां. परचुरे प्रकाशन मंदिराचे तरुण आणि उत्साही मालक श्री. ग. पां. परचुरे ह्यांचा आणि पुस्तकांत घालण्यासाठीं लागणारे फोटो विनामूल्य काढून दिल्याबद्दल माझे मित्र श्री. एल. आर. पाटकर ह्यांचा, मी अत्यंत आभारी आहें.

सहृदय प्रेक्षक आणि वाचकहो, नाटक हें दृश्यकाव्य असतें, ही जाणीव मनांत बाळगूनच आपण ह्या नाटकाचें परीक्षण कराल, अशी आशा धरून, मीं आपली तात्पुरती रजा घेतो.

आपला नम्र

**केशव पांडुरंग परांजपे.**

# १

[ श्रीनिवास बिल्डिंग्ज् ( मुगभाट मुंबई ४ ) मधील ब्लॉक नंबर १ व नंबर २ ह्यांचे दिवाणखाने रंगभूमीवर दिसत असतात. नंबर १ मध्यें **श्रीनिवास** नांवाचा २५-२६ वर्षें वयाचा तरुण राहातो. नंबर २ मध्यें **हरिहरपंत** ह्या नांवाचे ५० वर्षें वयाचे गृहस्थ राहातात. त्यांचेकडे त्यांचें दुसरेपणचें कुटुंब, **लक्ष्मीबाई** ( वय २०-२२ वर्षें ) व त्यांची पहिल्या बायकोची मुलगी **नलिनी** ( वय १९-२० वर्षें ) एवढींच माणसें आहेत. आतां तारीख १५ जूनचा सुमार आहे. रात्रीं आठ वाजण्याची वेळ. पडदा उघडतो. लक्ष्मीबाई कॉटवर अंथरूण घालीत असते. नलिनी खुर्चीवर बसून पुस्तक वाचीत असते. अंथरूण घालून झाल्यावर लक्ष्मीबाई नलिनीकडे रागानें पाहात आंतल्या खोलींत जाते व नलिनी पुस्तकांतून श्रीनिवासचा फोटो काढून पाहूं लागते. इतक्यांत दूरच्या घड्याळांत आठांचे टोले पडतात. ]

**लक्ष्मीबाई** : ( प्रवेश करून ) नलू , किती वाजले ग हे ?

**नलिनी** : मला कांहीं विचारलंत माई ?

**लक्ष्मीबाई** : हो हो ! तुला विचारलं ! ऐकायला नाहीं का आलं ? लक्ष कुठें होतं तुझं ? अग वाजले किती ?

**नलिनी** : [ हातावरील घड्याळांत पाहून ] आट.

**लक्ष्मीबाई** : पाहा ! आठ वाजले. अजून ह्यांचा पत्ता नाहीं. आतां ह्यानंतर ते पेढे येणार तरी केव्हां नि आजचा गुरुवार साजरा होणार तरी केव्हां ? [ आंतल्या खोलींतून बादली आणि कळशी घेऊन येते ] नलू, जा बरं पाण्याची एवढी शेवटची खेप घेऊन ये.

**नलिनी** : सकाळपासून सर्व पाणी मींच भरलं, स्वयंपाक केला. दमायला झालं बाई मला ! आतां एवढी खेप तुम्हीं आणलीत तर...

**लक्ष्मीबाई** : मला कांहीं होणार नाहीं. तुझी मात्र मी एकेक गंमत बघतें आहे. कुठें बाहेर जायचं आलं म्हणजे तूं मला जायला सांगतेस नि मी बाहेर गेल्याबरोबर तूं इथून बाहेर पाय काढतेस. चालली भटकायला ! भटकभवानी कुठची !

**नलिनी** : कुठं जातें हो मी ?

**लक्ष्मीबाई** : मला काय माहीत ? आपल्या मनाला विचार ! ठीक आहे. मी आणतें पाणी ! मला नाहीं कामाचा आळस येत. पण हें बघ, तूं मात्र जाऊं नकोस हो कुठें !

**नलिनी** : [ तिरस्कारानें ] हूं !

**लक्ष्मीबाई** : मी बाहेर कडी लावून घेणारच आहे म्हणा. ( जाते )

**नलिनी** : [ वेडावून ] बाहेरून कडी लावून घेणारच आहे म्हणा ? त्यापेक्षां तुरुंगांतच पाठवा ना मला ! [ श्रीनिवास आपल्या खोलींत प्रवेश करतो ] श्रीनिवास, अहो श्रीनिवास [ श्रीनिवास भिंतीला कान देतो ] माईनीं दाराला बाहेरून कडी लावली आहे तेवढी काढा ना ! प्लीज, काढा ना.

**श्रीनिवास** : येस, ओ. के. [ कडी काढून खोली नंबर २ मध्यें येतो ] अरे वा ! जादूच्या पेटींत सुंदर तरुणी लपवली आहे वाटतं ?

**नलिनी** : जादूची पेटी कसली, पिंजरा वाटतोय हा मला.

**श्रीनिवास** : किंवा तुरुंग म्हणा पाहिजे तर !

**नलिनी** : छे तुरुंग सुद्धा नव्हे. त्यांतले कैदी कामाकरितां कांहीं काळ तरी बाहेर पडूं शकतात.

**श्रीनिवास** : तुम्हांला बाहेर पडायची, हल्लीं इतकी का चोरी झाली आहे ?

**नलिनी** : चोरी नाहीं, मनाई—सक्त मनाई—झाली आहे. माईचा—माझ्या त्या सावत्र आईचा माझ्यावर खडा पहारा असतो. मीं कुणाशीं बोलतां कामा नये; कुणाकडे पाहातां कामा नये; एवढंच काय, मीं खोलीच्या सुद्धा बाहेर पडतां कामा नये.

**श्रीनिवास** : अगदीं कशाला सुद्धा ?

**नलिनी** : फक्त नळावर जायची मला परवानगी आहे. पण मीं त्या बाजूच्या नळावर नाहीं जायचं !

**श्रीनिवास** : असं ? कां बरं ?

**नलिनी** : कां बरं काय ? अहो तिकडे—त्या बाजूला—एक फार भयंकर मनुष्य राहातो.

**श्रीनिवास** : [हसून] म्हणजे मीच ना ? हं ! मी कांहीं डूक धरणारं विषारी जनावर नव्हे कीं पाहिल्याबरोबर तुम्हांला डसेन.

**नलिनी** : तसं एखादं जनावर डसलं तर माई म्हणतील, 'छान झालं. कटकट गेली एकदाची.'

**श्रीनिवास** : माई तुमची सावत्र आई. हा असा दुष्टावा चालायचाच !

**नलिनी** : पण त्यांनीं असं कां बरं करावं ? माईंना मदत करायची मी माझ्याकडून शिकस्त करतें. पण त्यांच्या कांहींच मनाला येत नाहीं त्याला मी तरी काय करणार ?

**श्रीनिवास** : एक दिवस डोळ्यांत झणझणीत अंजन घाला !

**नलिनी** : आणि बाता झोकण्यांत मोठ्या वस्ताद बरं का ! मी एखादी आश्चर्यकारक गोष्ट सांगितली कीं त्याहीपेक्षां आश्चर्यकारक गोष्ट त्या सांगणारच ! परवां मीं म्हटलं, सर्पोदर झालेल्या एका बाईच्या पोटांतून अडीच फूट लांबीचा साप

निघाला. लागलीच त्या म्हणाल्या कीं आमच्या गांवच्या एका बाईच्या पोटांतून अडीचशें फूट लांबीचा साप निघाला.

**श्रीनिवास** : अहो साप नसेल! आतडं असेल तें पोटांतलं!

**नलिनी** : मी म्हटलं, लग्न व्हायचं असलं म्हणून कांहीं मुलींवर इतकी करडी नजर ठेवायला नको. तर त्या म्हणाल्या—काय म्हणाल्या असतील सांगा बरं!

**श्रीनिवास** : काय म्हणणार? आमच्याकडे लग्न व्हायच्या मुलींना खोलींत कोंडून घालतात असं म्हणाल्या असतील!

**नलिनी** : छे! चुकलं! खोलींत कोंडून घालतातच! आणि शिवाय अंगावर रात्रंदिवस काळा बुरखा देतात. दुसऱ्यांनीं माझ्या चेहेऱ्याकडे पाहूं नयेच, पण मीं सुद्धा माझ्या चेहेऱ्याकडे पाहूं नये.

**श्रीनिवास** : म्हणजे काय?

**नलिनी** : म्हणजे आरशांत पाहूं नये!

**श्रीनिवास** : बरोबर! तुम्हांला पडदानशीन राहायला सांगतात त्या!

**नलिनी** : माझे मात्र पुरे हाल आले आहेत. परवां मॅट्रिकचा रिझल्ट लागेपर्यंत सारं ठीक होतं! त्यानंतर हा कैदखाना माझ्या नशिबीं आला!

**श्रीनिवास** : तुम्हीं हरिहरपंतांना कां नाहीं सांगत ह्या गोष्टी?

**नलिनी** : बाबांना ना? ते तर माईच्या ताटाखालचं मांजर. माईच्या शब्दाला मान डोलवून डोलवून, एखादे वेळीं त्यांची मान इतकी दुखायला लागते कीं शेवटीं त्यांना बरं वाटण्यासाठीं सायंटिफिक मसाजच करून घ्यावा लागतो. दुसरेपणची बायको ना! करतात काय!

**श्रीनिवास** : अरेरे! तुमच्या माईचं नांव लक्ष्मी ठेवण्याऐवजीं कडकलक्ष्मीच ठेवायला पाहिजे होतं!

**नलिनी** : माझ्याशीं भांडायच्याच त्या! घरांतलं माणूस ना मी? बाहेरचीं माणसं त्यांचीं बोलणीं काय म्हणून ऐकून घेतील? तेव्हां माझं एक जावो मेलं! पण शेजाऱ्या-पाजाऱ्यांशीं सुद्धा त्या इतका वितंडवाद करतात कीं आमच्याकडे कुणी म्हटल्या कुणी फिरकत नाहीं. नाहीं म्हणायला तळमजल्यावरच्या त्या ताराबाई नि शांता-रामाच्या चाळींतल्या त्या शांताबाई एवढ्याच काय त्या त्यांच्या जिवलग मैत्रिणी.

**श्रीनिवास** : तुम्हांला असं वागवून त्या काय मिळवणार ?

**नलिनी** : हेवादावा! अहो, बाबांनीं कधीं चुकून माकून दोन वेण्या आणल्या— दोन वेण्या आणणं म्हणजे कपिलाषष्ठीचाच योग म्हणा; पण समजा दोन वेण्या आणल्याच—तर दोन्हींही वेण्या त्याच घालतात. मला कधीं देत नाहींत.

**श्रीनिवास** : अरेरे ! वाईट वाटून घेऊं नका ! मी देईन कीं तुम्हांला वेण्या ! अं ?

**नलिनी** : इश्श ! असं कुठें म्हटलं मी ? तुम्हांला बँकेंत नोकरी लागून एक वर्ष होऊन गेलं ! त्याचे पेढे नाहीं मिळाले अद्याप ! नि म्हणे, मी देईन कीं तुम्हांला वेण्या !

**श्रीनिवास** : अहो पेढ्यांची गोष्ट निराळी नि वेण्यांची निराळी. तसं म्हटलं तर तुम्हींच मला पेढे दिले पाहिजे—मॅट्रिकमध्यें पास झाल्याबद्दल.

**नलिनी** : अहो पास होण्याची गोष्ट निराळी नि नोकरी मिळण्याची निराळी ! काढा; काढा बरं पेढे प्रथम.

**श्रीनिवास** : आतां पेढे कांहीं मिळायचे नाहींत; पण—चलाना माझ्याकडे. घाबरूं नका. मी कांहीं डसणार नाहीं तुम्हांला.

**नलिनी** : तें समजलं. पण माई नळावर गेल्या आहेत, त्या आतां परत येतील.

**श्रीनिवास** : आल्या म्हणून काय झालं ? तुमच्या माईंचा तुम्हीं फारच बागुलबुवा केला आहे बुवा ! या ना !

[ श्रीनिवास व नलिनी ब्लॉक नं. १ मध्यें जातात. नलिनी खुर्चीवर बसते. श्रीनिवास खोली साफ करूं लागतो ]

**नलिनी** : इश्श ! काय ही खोली ! हें अंथरूण नेहमीं घातलेलंच असतं वाटतं ?

**श्रीनिवास** : हो. रोज रोज कोण घालीत बसतो अंथरूण ? आला कीं पडला ! बस्स ! खरं सांगूं का, गृहं तु गृहिणी हीनं कांतारात् अतिरिच्यते.

**लक्ष्मीबाई** : [ कळशी व बादली घेऊन नं. २ मध्यें प्रवेश करतात ] अं ? ही गेली कुठें ? नि कशी गेली ?

**नलिनी** : लवकर पेढे द्या बरं का ! [ लक्ष्मीबाई भिंतीला कान लावून ऐकूं लागतात ]

**श्रीनिवास** : जरा बसा ना ! घाई कसली एवढी ?

**नलिनी** : नको. आमच्या त्या कडकलक्ष्मीबाई येतील इतक्यांत. तेव्हां पेढे बिढे लवकर देऊन टाका.

**श्रीनिवास** : पेढे कांहीं मिळायचे नाहींत आतां, पण [ सिगेरटची पेटी पाहून ] सिगरेट मिळेल. चालेल ?

**नलिनी** : ई ऽऽ!

**श्रीनिवास** : मग काय ? थंडगार पाणी देऊं ?

**नलिनी** : हं ! पेढ्याची तहान पाण्यावर भागवायची.

**श्रीनिवास** : [ रिकामा माट पाहून ] छे ! तें सुद्धा ब्रह्मचाऱ्याच्या घरांत मिळण्याची मारामारीच आहे. आतां पाण्याची तहान कशावर भागवायची ?

**लक्ष्मीबाई** : पेढे—पाणी—तहान ! छान छान चाल्लं आहे.

**नलिनी** : आतां माझ्या मनांत एक कल्पना आली आहे.

**श्रीनिवास** : कोणती ?

**नलिनी** : मी तिकडे गेलें म्हणजे म्हणेन, माई, मुंबईला बायका सिगरेट ओढतात. त्यावर त्या म्हणतील कीं आमच्याकडे बायका गुडगुडी ओढतात नि सिगरेट पटापट खातात. खरंच, नक्की असं म्हणतील त्या.

[ नलिनी व श्रीनिवास हसतात. लक्ष्मीबाई
संतापून ब्लॉक नं. १ मध्यें येतात ]

**लक्ष्मीबाई** : अग कार्टे, इथें कशाला आलीस ? चल नीघ इथून. बाहेर कशी पडलीस तूं खोलीच्या ?

[ नलिनी श्रीनिवासकडे पाहते ]

**श्रीनिवास** : सांगा, सांगा त्यांना काय खरं आहे तें.

**लक्ष्मीबाई** : सांगा सांगा ! नाहीं का आठवत एखादी थाप ?

**नलिनी** : ह्यांनीं बाहेरची कडी काढली !

**लक्ष्मीबाई** : ह्यांनीं म्हणजे ह्या गुंडानेंच ना ?

**नलिनी** : माई, गुंड नाहींत ! चांगले बी. ए. आहेत ते !

**लक्ष्मीबाई** : बी. ए. असूं दे नाहींतर जी. ए. असूं दे. त्यानें दाराची कडी काढली ह्यावरून काय तें दिसतंच आहे. आज कडी काढली; उद्यां दरवाजा सुद्धा फोडायचा हा ! म्हणून आपण त्याच्या खोलींत यायचं कीं काय ? चल इथून. [ ब्लॉक नं. २ मध्यें येतात ] काय तरी बाई पोर ?

**श्रीनिवास** : मी जी. ए. काय ? अं ? नि मी गुंड ? म्हणजे मला ती अजून ओळखत नाहीं असं दिसतं ! [ लक्ष्मीबाई भिंतीला कान देतात ] ती टिटाटवळी पुन्हा मला असं म्हणूंदे तर खरी; तिच्या कानाखालीं दोन बार काढीन.

**लक्ष्मीबाई** : [ नलिनीला ] तूं पुन्हा खोलीच्या बाहेर तरी पड ! तुझं तंगडंच मोडीन ! [ श्रीनिवास चपापतो व आंतल्या खोलींत जातो ] जा. ही बादली नि कळशी आंत नेऊन ठेव. [ नलिनी बादली व कळशी आंत नेते. ] आणि एक तांब्याभर पाणी घेऊन ये. मला फार तहान लागली आहे. [ नलिनी तांब्या घेऊन येते. तो आपल्या हातांत घेऊन नलिनीच्या तोंडाला लावते ] तुला पाणी हवं आहे ना ? पी आतां ! पी ! अं ? मी पाजतें कीं तुला हवं तितकं पाणी !

**नलिनी** : मला हें इथलं पाणी नको आहे.

**लक्ष्मीबाई** : मग कुठचं हवं आहे ?

**नलिनी** : तुम्हांला नाहीं समजायचं तें !

**लक्ष्मीबाई** : [ तांब्या खालीं ठेवून ] हो हो ! मी काय अशिक्षित; गांवढळ, नि तूं शिकलेली, शहाणी सुरती, शहरढळ ! पण हीं पाण्यें मला चांगलीं समजतात बरं ! थांब; आजपासून बाहेर जातांना दाराला बाहेरून कुलूपच ठोकून जातें.

**नलिनी** : माई, हा हो काय तुमचा आततायीपणा ? मी म्हणजे तुम्हांला कोण वाटतें ?

**लक्ष्मीबाई** : आपण ना ? आपण एक मोठ्या विदुषी आहांत; पण माझं आपल्याला ऐकायलाच हवं. निदान लग्न होईपर्यंत तरी तुला बाहेर जातां यायचं नाहीं !

**नलिनी** : लग्न होईपर्यंत बाहेर जातां यायचं नाहीं ! पण बाहेर गेल्याशिवाय लग्न तरी कसं होणार ?

**लक्ष्मीबाई** : बाहेर जाऊन लग्न होत नाहीं; पण विघ्न मात्र उपस्थित होतं !

**नलिनी** : तसं झालं तरी पुरवलं. हा कोंडवाडा नको मला. ह्या कोंडवाड्यांत कोंडायला मी काय गाय आहें होय ?

**लक्ष्मीबाई** : गाय नाहींस ग ! पण पारडी मात्र आहेस. चल, अभ्यास करायला लाग !

**नलिनी** : परीक्षा झाली, पास झालें ! आतां कसला करायचा अभ्यास ?

**लक्ष्मीबाई** : तर मग हा हरिविजय लाग वाचायला. चल.

[ नलिनी खुर्चीवर बसते. अर्धवट ओलेते झालेले **हरिहरपंत** भिजलेली छत्री घेऊन प्रवेश करतात. ]

**हरिहरपंत** : हु : हु : हु : ! थंडी भरली ! हु : हु : हु : !

**लक्ष्मीबाई** : आणले का पेढे ?

**हरिहरपंत** : अग पेढे कसले घेऊन बसलीस ? त्या पंचे डेपोपर्यंत गेलों नि अशी पावसाची सर आली, कांहीं विचारूं नकोस ! तशांत माझ्या छत्रीला जरासा भोसका पडलेला ! [ छत्री उघडतात. तिला फार मोठा भोसका असतो. ] नलू, जरा सुई-दोरा दे बघूं ! [ नलिनी सुई-दोरा देते. पंत सुईत दोरा ओवण्याचा प्रयत्न करतात. पण त्यांना जमत नाहीं. ] अग, एवढी सुई दे बरं ओवून. मला नीटसं न्याहाळत नाहीं रात्रीचं !

**लक्ष्मीबाई** : बेश न्याहाळतं सगळं. नि नसेलच दिसत तर आपल्या लेकीलाच सांगा ना ! तिला तरी दिसतं ना चांगलं ?

**नलिनी** : छे छे ! माझ्यापेक्षां तुमचीच दृष्टि आहे चांगली—कावळ्यासारखी. [ लक्ष्मीबाई सुई ओवून देते. पंत छत्री शिवूं लागतात. ] बाबा, तुम्हीं छत्रीच्या डॉक्टरकडे कां नाहीं गेलांत ?

**लक्ष्मीबाई** : ते जाताहेत डागदराकडे ! स्वतः कधीं आजारी पडले तरी डागदराला एक पैही द्यायचे नाहींत. मग छत्रीकरतां तर काय बोलायलाच नको !

**नलिनी** : माई, मुंबईत छत्र्या दुरुस्त करणारे—म्हणजे छत्रीचे डॉक्टर फार आहेत. समजलं का ?

**हरिहरपंत** : तिला काय त्यांत समजणार आहे ?

**लक्ष्मीबाई** : त्यांत काय समजायचं आहे ? खेडेगांवांत वैद्य असतात, तसे

शहरांत डागदर असतात! खेडेगांवांत मातीच्या चुली तर शहरांत भिडाच्या चुली! एकूण काय चुलीच! होय कीं नाहीं?

**हरिहरपंत** : नाहीं नाहीं! हो हो! तूं म्हटतेस तें अगदीं बरोबर आहे. काय नलू? [ ' हो म्हण ' म्हणून खुणावतात. ]

**नलिनी** : डॉक्टर, चुली—बरोबर बरोबर.

**हरिहरपंत** : [ छत्री शिवून होते ] चला! आतां एवढा पावसाळा तरी बघायला नको. खरोखर आज एवढा जोराचा वारा पाऊस येऊन सुद्धा छत्रीवरच निभावलं ही दत्ताची कृपाच म्हणायची!

**लक्ष्मीबाई** : दत्तानें कृपा केली, पण त्याला ठेवायला पेढे आणलेत का! आज गुरुवार ना?

**हरिहरपंत** : हो हो. आज गुरुवार! म्हणून मी पेढे आणायला गेलों सुद्धा. पण तेवढ्यांत हा जोराचा पाऊस आला नि माझ्या मनांत एक विचार आला. म्हटलं तुझं मत घ्यावं! असं पाहा, आपण आतां कुठचा तरी एक वार करूं या. एक गुरुवार तरी किंवा सोमवार तरी. मी आपला पूर्वीपासून दत्तालाच भजतों. म्हणून गुरुवारीं पेढे-हार आणतां. आतां तूं आलीस. आतां आम्हांला तुझ्या मताप्रमाणं चालावं लागतं. तूं आहेस सोमवार करणारी—शंकराची पार्वती!

**लक्ष्मीबाई** : शंकराची कसली, लंकेची पार्वती आहे मी! एक फुटका मणी तरी आहे का अंगावर!

**नलिनी** : फुटका मणी मात्र खरोखरच नाहीं हं अंगावर!

**लक्ष्मीबाई** : जरा कुठें चार चौघांत जायचं असलं तर मला बाई लाज वाटते! आतां आज सिनेमाला जायचं आहे माझ्या मनांतून. पण असं ओकंबोकं शरीर घेऊन कसं जायचं?

**हरिहरपंत** : हुः हुः हुः!

**लक्ष्मीबाई** : काय झालं हु हु करायला? मीं सिनेमाला जायचं म्हटलं म्हणून थंडी भरली असेल ही!

**हरिहरपंत** : तसं नव्हे ग! काय बरं म्हणत होतों मी? हां! आपण एक देव ठरवूं या! एको देवः केशवो वा शिवो वा! मी म्हणतों शंकरापेक्षां दत्तच बरा!

**लक्ष्मीबाई** : म्हणजे सोमवारीं बेलाचीं चार पानं आणतां तो सुद्धा खर्च वांचला. कद्रू कुठले !

**हरिहरपंत** : अग पैशाचा तसा प्रश्न नाहीं. आपण दत्ताची पूजा केली म्हणजे त्यांत ब्रह्मा, विष्णु, महेश असे तिघेही येतात. काय ?

**लक्ष्मीबाई** : तें तुमचं मी कांहींएक ऐकणार नाहीं. सोमवार झाला पाहिजे, गुरुवार झाला पाहिजे नि आज सिनेमाही पाहिला पाहिजे.

**नलिनी** : माई, आज खरंच सिनेमाला जायचं ?

**लक्ष्मीबाई** : हो खरंच जायचं !

**नलिनी** : वा वा ! मला आधीं पातळ बदलूं दे.

**लक्ष्मीबाई** : पण तूं नाहीं यायचं.

**हरिहरपंत** : मग एकटीच जाणार का तूं ?

**लक्ष्मीबाई** : आपण दोघांनींच जायचं नि हिनें घरीं राहायचं !

**हरिहरपंत** : मला रोज रोज जागरणं झेपतील का ह्या वयांत ?

**लक्ष्मीबाई** : अन् हो. आपल्याला एक सांगायचंच राहिलं.

**हरिहरपंत** : आतां आणखी काय सांगायचं राहिलं ?

**लक्ष्मीबाई** : आपल्या नलूचं लवकरच लग्न उरकून टाकलं पाहिजे. आज तिनें काय प्रकार केला माहीत आहे ?

**हरिहरपंत** : कां, काय केलं ?

**लक्ष्मीबाई** : त्या शेजारच्या गुंडाच्या खोलींत जाऊन बोलत बसली होती त्याच्याशीं !

**नलिनी** : बाबा, काय झालं हो गेलें त्यांच्या खोलींत तर ?

**लक्ष्मीबाई** : तुझं काय अडेल तिथें नाहीं गेलीस तर ?

**नलिनी** : बाबा, मॅट्रिकची परीक्षा होईपर्यंत नव्हतें का जात त्यांच्याकडे शिकवणीला ? कित्ती चांगले शिकवायचे ते ! नि माझ्यासाठीं त्यांनीं किती मेहनत घेतली. म्हणून तर मी पहिल्या वर्गांत पास झालें. परीक्षा होईपर्यंत त्यांच्याकडे गेलें तरी चालत होतं. आतां मात्र...

**हरिहरपंत** : अग तो तुला फुकट शिकवीत होता, म्हणून मी जरा काणाडोळा करीत होतों. परंतु खरं विचारशील तर माझं कांहीं त्याच्याविषयीं तितकंस चांगलं मत नाहीं.

**लक्ष्मीबाई** : आणि त्यानें ह्या दरवाजाला लावलेली बाहेरची कडी काढून हिला आपल्या खोलींत नेली.

**हरिहरपंत** : असं काय ? [ श्रीनिवास खुजा घेऊन नळावर जाऊं लागतो ] काहो श्रीनिवास, कुठें चाललां ?

**श्रीनिवास** : [ ब्लॉक नं. २ मध्यें प्रवेश करून ] नळावर !

**हरिहरपंत** : मग त्या बाजूला नाहीं वाटतं? अं ? नळाचं निमित्त करून नलूकडे पाहायला पाहिजे ? पण याद राखून ठेवा...

**श्रीनिवास** : हें पाहा, उगाच रागावूं नका. त्या बाजूच्या नळावर ह्या खोलींतल्या बिऱ्हाडकरूंनीं जायचं नाहीं असा कांहीं मालकाचा कायदा नाहीं ना ?

**हरिहरपंत** : नाहीं नाहीं ! कायद्याचं मला कांहीं सांगतां येत नाहीं आत्तांच !

**श्रीनिवास** : आणि आपण म्हणतां त्या दृष्टीनें माझं लक्षच नसतं. काय नलू? नाहीं नलिनीबाई ! [ जातो ]

**लक्ष्मीबाई** : पाहिलंत, पाहिलंत कसं उत्तर दिलं तें ? म्हणून म्हणतें, हिचं एकदा लवकर लग्न होऊन जाऊं दे, म्हणजे आपण सुटलों एकदाचीं !

**नलिनी** : आणि मी ही सुटलें जन्माची !

**लक्ष्मीबाई** : मी तिच्याकरतां एक वर ठरवून सुद्धा टाकला आहे.

**हरिहरपंत** : वा वा ! किती ही मुलीची काळजी ! हो, पण त्याचं नांव काय?

**लक्ष्मीबाई** : ते—शांतारामाच्या चाळींतले शांतारामपंत !

**हरिहरपंत** : तो पन्नास वर्षांचा केसपिक्या थेरडा ?

**नलिनी** : इश्श ! त्या कुबड्याशीं लग्न करायला मी मुळींच तयार नाहीं.

**हरिहरपंत** : अग त्याला कर्ज आहे म्हणतात !

**नलिनी** : शिवाय त्याला पहिल्या बायकोची एक मुलगीही आहे.

**हरिहरपंत** : त्याला ट्रॅममध्यें सुद्धा दुसऱ्यांनीं चढवावा लागतो.

**नलिनी** : सोनापुरांत त्याचीं लाकडं सुद्धा खरेदी करून झालीं असतील.

**हरिहरपंत** : म्युनिसिपॅलिटीचा पास सुद्धा आला असेल कदाचित्.

**लक्ष्मीबाई** : मग त्याला काय हरकत आहे ? तुम्हीं नाहीं का पन्नास वर्षांचे ? तुम्हांला नाहीं का पहिल्या बायकोची मुलगी ? तुमच्या नाहीं का गोवऱ्या...

**हरिहरपंत** : अग हो हो...

**लक्ष्मीबाई** : आणि असं असतांनाही मीं तुमच्याशीं लग्न केलंच ना ?

**हरिहरपंत** : तें जरी खरं असलं तरी माझ्या मुलीचं मात्र बिजवराशीं लग्न होऊं नये असं मला वाटतं. अगदीं स्वानुभवावरून सांगतों आहें मी हें !

**लक्ष्मीबाई** : आपला जीव तेवढा वचावला पाहिजे, मग भले दुसऱ्याचा जीव गेला तरी हरकत नाहीं. असंच ना ?

**हरिहरपंत** : तसं नव्हे ग ! पहिल्या बायकोची मुलगी जिवंत असली तर सावत्र आईशीं तिचं भांडण जुंपतं, झोंबाझोंबी सुरू होते दोघींची !

**नलिनी** : आणि ती आई आपल्या सावत्र मुलीला छळून खाते !

**हरिहरपंत** : त्यापेक्षां मीं तिच्यासाठीं जी नवऱ्याची निवड केली आहे ती फार चांगली आहे.

**नलिनी** : बाबा, माझ्याकरतां नवऱ्याची निवड माई करतात, तुम्हीं करतां नि माझी आवड कुणी लक्षांतच घेत नाहीं हें कसं ?

**लक्ष्मीबाई** : लग्न व्हायच्या मुलींना मुळीं आवड निवडच नसते.

**हरिहरपंत** : आमची निवड तीच तुझी आवड !

**लक्ष्मीबाई** : आमच्या खेडेगांवांतल्या मुली अशाच वागतात, मीं नाहीं ह्यांना माळ घातली ?

**हरिहरपंत** : नि मी कळवल्याप्रमाणें तो नवरा मुलगा उद्यां हिला पाहायला येणार आहे. आणि दत्ताची कृपा असली तर हें लग्न जुळूनही जाईल !

**लक्ष्मीबाई** : दत्ताची कृपा तेवढी पाहिजे. पण त्याला पेढे कांहीं आणायला नकोत ! जा आधीं पेढे आणायला.

**हरिहरपंत** : मी खरं सांगू का ? मी आतां फार दमलों आहें ग ! तेव्हां नलूच जाऊन आणीना पेढे ?

**लक्ष्मीबाई** : तिला नाहीं पाठवायची बाहेर.

**हरिहरपंत** : मग तूं जा !

**लक्ष्मीबाई** : मी रात्रीच्या वेळीं रस्ताच चुकतें.

**नलिनी** : आणि मग मुगभाटांत यायच्या ऐवजीं माई बोरघाटांत जातील.

**लक्ष्मीबाई** : अहाहा ! बोरघाट कुठं आहे तो मला माहीतच नाहीं जसा कांहीं !

**हरिहरपंत** : कुठें ? कुठं आहे बोरघाट ?

**लक्ष्मीबाई** : सांगायलाच हवा का ? बरोबर सांगितलं म्हणजे चेहेरे काळवंड-तील. दांत पडतील.

**हरिहरपंत** : पडूं देत. असतील त्याचे पडतील. तेव्हां सांगाच एकदा.

**लक्ष्मीबाई** : तो–चौपाटीवर जातांना लागतो तो !

**हरिहरपंत** : हो हो हो !

**नलिनी** : लागतो लागतो !

**लक्ष्मीबाई** : तेव्हां उठा. तुम्हींच पेढे आणायला जा.

**हरिहरपंत** : हं !

**लक्ष्मीबाई** : लवकर परत या बरं का !

**हरिहरपंत** : हो.

**लक्ष्मीबाई** : आज सिनेमाला जायचं आहे म्हणून म्हणतें.

**हरिहरपंत** : हुः हुः हुः ! [ जातो ]

**नलिनी** : माई, कोण पाहायला येणार आहेत हो उद्यां ?

**लक्ष्मीबाई** : असेल यायचा मसण्या मांडवकर. हें बघ नले, मी त्या शांताबाईकडे जाऊन येतें हं !

**नलिनी** : कशाला ?

**लक्ष्मीबाई** : त्या म्हणाल्या होत्या कीं जमलं तर त्या सुद्धा येणार आहेत

सिनेमाला. म्हणून विचारून येतें त्यांना. तूं बस इथं. [ कुलूप घेते व बाहेर जाऊन दाराला कुलूप लावूं लागते. ]

**नलिनी** : शांताबाई तुमच्याबरोबर आल्या तरी चालतील. पण मी मात्र नको.

**श्रीनिवास** : [ पाण्याचा खुजा घेऊन आपल्या खोलींत येतांना ] लाखों बायकांत अशि देखणी...

**लक्ष्मीबाई** : [ खिडकींतून ] जळ्ळीं मेल्यांचीं तोंडं तीं ! काय तरी बाई पदं हीं ! [ जाते ]

**श्रीनिवास** : [ आपल्या खोलींत ] तिच्या ग वाणी पाहिलिग नाहीं कुणी. [ आंतल्या खोलींत जातो ]

**नलिनी** : [ प्रथम इकडे तिकडे कांहीं तरी शोधीत असते. नंतर एकदम आठवण आल्यासारखं करून टेबलावरील एक पुस्तक उघडून त्यांतून श्रीनिवासचा फोटो काढून पाहूं लागते ] श्रीनिवास, हा कोंडमारा मला आतां असह्य झाला आहे. तुम्हीं जर मला साहाय्य केलंत तरच मी ह्यांतून सुटेन नि नंतर...

**येईल भूवरी स्वर्ग मोहना**
**होशिल तूं जरि माझा**
**वाहिन माझे प्राण साजणा**
**होशिल तूं जरि माझा**
**मंथुनि सागर, सौख्य सुधाघट, रंगुनि तुझिया प्रेम परागीं**
**आणिन तूं जरि माझा**
**सागर खवळे वादळ गरजे**
**पैल तिरा कशि जाऊं ?**
**अंधकार घनदाट पसरला**
**वाट तुझी किति पाहूं ?**
**तरेल कैसी जीवन-नौका**
**जोंवरि तूं नच माझा**

[ नलिनी मधल्या दारावर टिकटिक करते ]

**श्रीनिवास** : [ आपल्या ब्लॉकच्या दिवाणखान्यांत येऊन ] कोण, कोण आहे ?

**नलिनी** : मी. मी ती !

**श्रीनिवास** : खोलीच्या दाराला तर बाहेरून कुलूप आहे !

**नलिनी** : म्हणूनच मी इथें अडकून पडलें आहे हो. कोण मला सोडवणार ?

**श्रीनिवास** : अहो असं करा; त्या मधल्या दाराला तर कुलूप नाहीं ना ठोकलं ?

**नलिनी** : नाहीं. फक्त कडीच घातली आहे.

**श्रीनिवास** : मग तुम्हीं तिकडची कडी काढा. मी इकडची कडी काढतों. [ दोघें दोन्ही बाजूंच्या कड्या काढतात. नलिनी श्रीनिवासच्या खोलींत जाते ]

**नलिनी** : मी मघाशीं इकडे आलें म्हणून माई किती रागावल्या !

**श्रीनिवास** : तरी सुद्धा तुम्हीं परत इथें आलांत.

**नलिनी** : माझ्या आयुष्याचं मातेरं व्हायची वेळ आली तरीही मी गप्प कशी बसूं ?

**श्रीनिवास** : म्हणजे झालं तरी काय ?

**नलिनी** : माईनीं नि बाबांनीं माझं लग्न उरकून टाकायचा चंग बांधला आहे.

**श्रीनिवास** : वा वा ! फार छान.

**नलिनी** : माईच्या मनांतून मला एका म्हाताऱ्या खोडाच्या गळ्यांत बांधायची आहे.

**श्रीनिवास** : साळीचा भात पंक्तीला नि म्हातारा नवरा गमतीला. उत्तम उत्तम ! आणि बाबांच्या मनांतून ?

**नलिनी** : त्यांनीं नेमस्त केलेला वर उद्यां मला पाहायला येणार आहे. नि हें ऐकल्यापासून माझ्या छातींत धडकीच भरली आहे.

**श्रीनिवास** : छे छे ! धडकी नव्हे ती. तुमचा ऊर भरून त्यांतून प्रेमाचा पूर वाहायला लागला असेल तो.

**नलिनी** : हें हो काय ? तुम्हांला आतां सुद्धा थट्टा सुचते कशी ?

**श्रीनिवास** : मी थट्टा करूं नको तर काय करूं ? माझ्या मनांत खूप निरनिराळे विचार असतील. अहो तुमच्या वडिलांना जवळचीं स्थळं दिसणारच नाहींत. बरोबर आहे. परसांतल्या भाजीला किंमतच नसते मुळीं !

**नलिनी** : किंवा पिकतं तिथं विकत नसतं !

**श्रीनिवास** : पुष्कळदा असं होतं कीं पिकतं तिथं विकत नाहींच, पण नसतं मात्र !

**नलिनी** : म्हणजे काय ?

**श्रीनिवास** : आधीं मुलींना आईबाप घोडनवऱ्या होईपर्यंत वाढूं देतात !

**नलिनी** : घोडनवऱ्या काय ?

**श्रीनिवास** : रागावूं नका घोडनवरी म्हटलं म्हणून ! सर्वसाधारण स्थळ लक्षांतच येत नाहीं त्यांच्या. त्यांना पाहिजे असतो श्रीमंत जांवई ! बडा ऑफिसर ! आणि इकडे तर पैसा खर्च करण्याची इच्छा नसते किंवा ताकद नसते. आता तरुण मनुष्य सर्वसाधारणतः बडा ऑफिसर कांहीं होऊं शकत नाहीं. आणि मग ओघानेंच ते बिजवराच्या गळ्यांत पोरगी बांधायला तयार होतात. बापाकडे सर्व साधारण बऱ्या स्थितींत वाढलेल्या ह्या पोरी तरुण नवऱ्याबरोबर कष्टप्रद जीवन कंठण्यापेक्षां, म्हाताऱ्याबरोबर का होईना पण चैनींत राहायला मिळेल म्हणून एखाद्या अंगं गलितं पलितं मुंडं अशा थेरड्यार्शीही लग्न करायला तयार होतात. काय खरं कीं नाहीं ?

**नलिनी** : अगदीं चूक आहे तुमची विचारसरणी. हें तुमचं मत एकाही मुलीला पटायचं नाहीं नि मला तर नाहींच नाहीं.

**श्रीनिवास** : हो का ? मग त्याबद्दल मला आनंदच आहे.

**नलिनी** : हो खरंच ! आज एक गंमत करायची आहे माझ्या मनांतून.

**श्रीनिवास** : कोणती ?

**नलिनी** : आज माई नि बाबा सिनेमाला जाणार आहेत. तेव्हां तीं गेल्यावर आपण सुद्धा जाऊं सिनेमाला. याल ना तुम्हीं ?

**श्रीनिवास** : त्यांत हो काय? मी आनंदानें येईन.

**नलिनी** : मग हें ठरलं बरं का.

**हरिहरपंत** : [आपल्या खोलीच्या खिडकींतून] नलू, ए नलू...

**नलिनी** : अगबाई बाबा आले वाटतं! आतां मी मधल्या दारानें तिकडे गेलें तर ते मला पाहातील. आणि इथेंच राहिलें तर ते कदाचित इकडेही येतील.

**श्रीनिवास** : तुम्हीं आंतल्या खोलींत व्हा !

**नलिनी** : तुम्हीं कसंही करून बाबांना बाहेर न्या. [ आंत जाते ]

[ श्रीनिवास व्यायाम करूं लागतो. पंत
त्याच्याकडे येतात. दोघेही बसतात. ]

**हरिहरपंत** : काहो, आमची नलू इकडे आली आहे का ?

**श्रीनिवास** : पंत, मघां मीं तुम्हांला जें उत्तर दिलं त्याचं वाईट वाटतं मला. आपण फिरायला चलता का ? मी सर्व गोष्टींचा उलगडा करतों.

**हरिहरपंत** : नकोरे बाबा. सारखी पायपीट करून माझे पाय दुखायला लागले आहेत. मी जरा टेकतों इथेंच. [ कॉटवर बसतात ]

**श्रीनिवास** : [ हताश होऊन ] काय, विशेष बातमी काय आहे ?

**हरिहरपंत** : कसली विशेष बातमी ? [आंत बांगड्यांचा आवाज होतो] काहो श्रीनिवास, कोण आहे तिकडे ?

**श्रीनिवास** : कुठें कुठें ? [ दरवाजाकडे पाहातो ]

**हरिहरपंत** : अहो, इकडून, इकडून आवाज आला.

**श्रीनिवास** : असेल एखादा उंदीर बिंदीर. लेका, ब्रह्मचाऱ्याच्या घरांत तुला कांहींएक मिळणार नाहीं.

**हरिहरपंत** : अहो उंदीर नव्हे. बांगड्यांचा आवाज आला चांगला. उंदीर बांगड्या कधींपासून भरायला लागले ?

**श्रीनिवास** : तर मग तो बांगडा उंदीर असेल; किंवा असंही असेल, आपल्याला भास झाला असेल तो. म्हातारपण झालं आहे आपलं. तेव्हां कदाचित भ्रमही असेल.

**हरिहरपंत** : भास नाहीं, भ्रम नाहीं. खात्री झाली आहे माझी कीं तिथें कुणीतरी बाई असावी.

**श्रीनिवास** : बाई ? नि माझ्या घरीं ? वा पंत, खूप केलीत ! अहो तुमच्या खोलींतून आवाज आला असेल तो.

**हरिहरपंत** : छे हो ! ह्याच खोलींतून आवाज आला.

**श्रीनिवास** : पंत, जमलं! अहो तुम्हीं बसलां आहांत–स्प्रिंगच्या कॉटवर बसलां आहांत. तेव्हां स्प्रिंगांचा आवाज आला असेल तो ‘ कुरुकुरु ’ असा.

**हरिहरपंत** : हे अंदाज कशाला ? मी प्रत्यक्ष तिथें जाऊनच पाहातों.

[ पंत खोलींत जाऊं लागतात. श्रीनिवास त्यांना अडवतो ]

**श्रीनिवास** : तिकडे कशाला जातां ?

**हरिहरपंत** : पाहातों, तिकडे उंदीर आहे का चिचुंद्री आहे !

**श्रीनिवास** : मी नाहीं तुम्हांला तिकडे जाऊं देणार. माझ्या खाजगी गोष्टींत तुम्हीं लक्ष देतां कामा नये !

**हरिहरपंत** : कां हो कां ?

**श्रीनिवास** : तुमचा माझा संबंध काय ?

**हरिहरपंत** : संबंध काय ? मी ह्या चाळींतला एक सच्छील रहिवाशी आहें.

**श्रीनिवास** : आणि मी कोण आहें ?

**हरिहरपंत** : तें आपल्या मनाला विचारा ! पोरीबाळींनीं गजबजलेल्या ह्या चाळींत जर तुम्हीं असले चाळे सुरू केलेत तर आम्हांला तिकडे लक्ष दिलंच पाहिजे. तुम्हीं जर आपल्या घरांत धडधडीत बाया नाचवायला लागलांत...

**श्रीनिवास** : काय, काय म्हणालांत ?

**हरिहरपंत** : मी म्हणतों, तुम्ही जर अशा बाया नाचवायला लागलांत तर आम्ही तें डोळे उघडे ठेवून पाहावं कीं काय ?

**श्रीनिवास** : पाहावत नसेल तर डोळे मिटून घ्या, नाहींतर कायमचे मिटा.

**हरिहरपंत** : काय म्हणतोस रे ?

[ लक्ष्मीबाई आपल्या खोलीच्या दाराचें कुलूप काढून आंत येते ]

**हरिहरपंत** : जास्तसा दम देतो आहेस ?

**श्रीनिवास** : दमबीम कांहीं नाहीं. तुम्हीं प्रथम खोलीच्या बाहेर व्हा.

[ लक्ष्मीबाई मधलें दार उघडते ]

**हरिहरपंत** : असं ? होतों होतों ! माझी तेवढी पेढ्यांची पुडी द्या.

**श्रीनिवास** : [पुडी देतो] ही घ्या. मला काय करायची आहे तुमची पेढ्यांची पुडी?

**लक्ष्मीबाई** : अहो, आपली नलू कुठें आहे? तिला आंत ठेवून मी दाराला बाहेरून कुलूप लावून गेलें होतें.

**हरिहरपंत** : असं? तर मग ती ह्याच्याच खोलींत असली पाहिजे. चल शोधूं आपण त्याचं घर. [आंत जाऊं लागतात]

**श्रीनिवास** : तिकडे कुठें चाललांत? माझ्या हुकमाशिवाय माझ्या घरांत शिरायचा तुम्हांला मुळींच अधिकार नाहीं.

**लक्ष्मीबाई** : अधिकार नाहीं म्हणतोय गुड! तुम्हीं जाहो आंत.

[लक्ष्मीबाई पंतांना आंत ढकलते. श्रीनिवास त्यांना अडवतो]

**हरिहरपंत** : अरेरे! ह्या झटापटींत माझीं हाडं खिळखिळीं झालीं.

**नलिनी** : [आंतून पुरुषी आवाजानें] ए श्रीनिवास, चल झाली माझी तयारी. माझा सर्व स्त्रीपार्ट सजून तयार झाला.

**श्रीनिवास** : अँ?

**नलिनी** : ९॥ वाजायला झाले. आपण स्टूडिओंत ह्या पूर्वींच जायला पाहिजे होतं. तूं कपडे केलेस कीं नाहींस? तूं पती नि मी पत्नी असा आपला एक फोटो काढायचा आहे ना?

**श्रीनिवास** : हो हो. पाहाणारांना वाटलं पाहिजे कीं हें जोडपंच आहे.

**हरिहरपंत** : अं? ही काय भानगड आहे?

**श्रीनिवास** : त्याचं असं झालं पंत, त्या माझ्या मित्राला......

**हरिहरपंत** : काहो? मित्रच आहे ना?

**श्रीनिवास** : काय हें पंत? मी ब्रह्मचारी असलों तरी अगदींच कांहीं 'हा' नाहीं. तेव्हां ह्या माझ्या मित्राला स्त्री भूमिकेंतला फोटो काढायचा आहे, म्हणून तयार होण्याकरतां तो इथें आला.

**हरिहरपंत** : असं होय? मग हें तुम्हीं पूर्वींच कां नाहीं सांगितलंत?

**श्रीनिवास** : तेव्हां तुम्हीं आतां या!

**हरिहरपंत** : त्याला बाहेर येऊं दे ना ! हॅ हॅ हॅ ! आम्ही पाहूं तरी कसा काय सजला आहे तो ! म्हणजे तेवढंच आपलं ! [ खुर्चीवर बसतात ]

**लक्ष्मीबाई** : त्याच्यांत काय बघायचं आहे ? इश्श ! काय तरी बाई चळ ? चला घरीं. [ पंतांना ओढते ]

**श्रीनिवास** : ए चल रे ! [ श्रीनिवास आंतल्या खोलींत जातो ]

**हरिहरपंत** : अग, आपणही आपला एक एकत्र फोटो काढूं बरं का.

**लक्ष्मीबाई** : फोटोमध्यें मी उभी राहायची कीं तुम्हीं उभे राहाणार ?

**हरिहरपंत** : मी उभा राहीन, तूं बस. तूं उभी राहा, मी बसेन. आपण दोघंही उभींच राहूं किंवा दोघंही बसूं. दोघांचा फोटो आला म्हणजे झालं.

**लक्ष्मीबाई** : [ आंत पाहून ] अहो, हें पातळ परवां आपण नलू पास झाल्याबद्दल तिला आणलेल्या पातळासारखं आहे नाहीं ? पाहा बरं जरा पुढें होऊन.

**हरिहरपंत** : काय पाहायचं पातळांत ? आजकाल एखादा नवीन नमुना निघाला म्हणजे सांथीच्या रोगासारखा चोहोंकडे फैलावतो नि हे दुकानदार सुद्धा त्याला एखादं नवीन नांव देतात. हं ! हा काय म्हणे चटणी कलर नि हा आमटी कलर. मग चालल्लांत तुम्ही चटणी नि आमटी घ्यायला !

**लक्ष्मीबाई** : तुम्हीं कांहीं म्हणा, मला मात्र कांहीं तरी संशय येतो आहे. मघां त्यानें कडी काढली नि ही त्याच्या खोलींत गेली. पुन्हा हिला खोलींत कोंडून ठेवून गेलें तर ती पुन्हा खोलींतून अदृश्य झालेली. आतां ह्याच्या खोलींत कुणी तरी बाई आहेच. पातळासारखंच पातळ. तेव्हां तुम्हीं आंत जा नि पाहा.

**हरिहरपंत** [ आंत जाऊं लागतात, परंतु विचार करून परत फिरतात ] अग, तो बाईच्या वेषांत आहे. मी जर त्याला हात लावला तर लोकांना वाटायचं मी बाईच्या अंगचटीला जातों. तेव्हां तूंच पुढें हो नि पाहा.

**लक्ष्मीबाई** : [ जाऊं लागते. मध्येंच थांबून ] वा ! बाईच्या वेषांत असला तरी तो पुरुषच ना ? मी त्याच्या अंगाला हात लावायची खोटी, तो पदर देईल भिरकावून नि बोंबलायला लागेल कीं ही बाई माझ्याशीं लगट करायला लागली.

**हरिहरपंत** : तर मग असं करूं ! तो एकाच वेळीं पुरुष नि स्त्री आहे. तर आपण दोघांनीं एकाच वेळीं त्याच्यावर हल्ला चढवूं या !

[ पंत व लक्ष्मीबाई दरवाजाच्या दोन बाजूंना उभीं राहातात ]

**श्रीनिवास** : [ प्रवेश करून ] बाजू बाजू ! अर्धनारीनटेश्वरकी स्वारी आ रही है। बाजू हटो.

**नलिनी** [ तोंडावर पदर ओढून प्रवेश करून पुरुषी आवाजांत ] दूर व्हा म्हणतें ना ! म्हणतों ना. [ नेहमींच्या आवाजांत ] दूर व्हायला काय घ्याल ?

**लक्ष्मीबाई** : [ नलिनीच्या तोंडावरचा पदर काढून ] अगोबाई ! ही तर आमची नलू !

**हरिहरपंत** : अरेच्या ! ही कार्टी काय ? का हो मिस्टर, हे तुमचे दोस्त वाटतं ? आमच्या डोळ्यांदेखत आमची पोरगी पळवून नेतां होय ? थांबा ! उद्यांच तुमचं बिऱ्हाड इथून काढून लावतों. हे सडेफटिंग ब्रह्मचारी, ह्या बालबच्चेवाल्यांच्या चाळींत नकोतच राहायला ! गुलाम बघतो आहे बघा कसा तो !

**लक्ष्मीबाई** : माजलेल्या रेड्यासारखा.

**श्रीनिवास** : पंत, मला जरा बोलायची संधी द्याल तर...

**हरिहरपंत** : कांहीं बोलूं नको. तूं काय बोलणार तें मला माहीत आहे. [ नलूला ] चल, चल आपल्या खोलींत. [ आपल्या ब्लॉकमध्यें येऊन मधला दरवाजा लावून घेतात ] दाराला बाहेरून कुलूप असतांना कशी गेलीस त्याच्या खोलींत ?

**लक्ष्मीबाई** : [ कडी पाहून ] दोघांनींही आपापल्या बाजूच्या कड्या काढल्या. थांबा ! आतां बाहेर जातांना इथें सुद्धा कुलूप ठोकतें !

**हरिहरपंत** : काय ग, कुठें चालली होतीस त्याच्याबरोबर ?

**नलिनी** : सिनेमाला.

**लक्ष्मीबाई** : अगबाई, खरंच सिनेमाला जायची वेळ झाली.

**हरिहरपंत** : आज नाहीं गेलों तर नाहीं का चालणार ? मी फार दमलें आहें ग ! शिवाय आपण हा फुकट सिनेमा पाहिलाच आहे. नि त्यांत कामही केलं आहे नायिकेच्या आईबापाचं !

**लक्ष्मीबाई** : तें कांहीं नाहीं. आज खरा सिनेमा व्हायलाच पाहिजे.

**हरिहरपंत** : म्हणजे खरा सिनेमा कोणता ? तो कीं हा ?

**नलिनी** : [ लडिवाळपणानें ] बाबा, मी पण येतें सिनेमाला.

**हरिहरपंत** : अं ? ( खोकतो ) चल चल.

**लक्ष्मीबाई** : चल कशाला ? उद्यां तिला पाह्यला येणार आहेत ना ? मग आज तिला जाग्रण कशाला ?

**हरिहरपंत** : हो हो. खरं म्हणतेस तूं !

**लक्ष्मीबाई** : कोण पाह्यला येणार आहेत हो ?

**हरिहरपंत** : जीवनजी चाळींत कुणी सदोबा सनातने नांवाचे गृहस्थ राहातात. मी अद्याप त्यांना पाहिलंच नाहीं. आमच्या ऑफिसांतल्या मित्रामार्फतच ठरलं आहे हें. पोरगा म्हणे असा दांड आहे, बजरंगाच्याही छातीवर बसेल. फक्कड दाढी सुद्धा वाढवली आहे म्हणे त्यानें. तो येणार आहे उद्यां रात्रीं ९ वाजतां.

**लक्ष्मीबाई** : बराच सनातनी दिसतोय !

**हरिहरपंत** : असेना सनातनी ? श्रीमंत आहे ना ? झालं तर मग. नलू, माझी ती माकडटोपी आण बरं !

**लक्ष्मीबाई** : ती कशाला ?

**हरिहरपंत** : ती आपली बरी. थंडी लागत नाहीं. [ नलिनी टोपी देते. पंत टोपी घालतात. ]

**लक्ष्मीबाई** : अहो, आपण सिनेमाला चाललों आहों, पुराणाला नव्हे. काढा ती माकडटोपी [ टोपी खसकन् काढते ]

**हरिहरपंत** : अग पण, अग पण, मला थंडी लागेल ती ?

**लक्ष्मीबाई** : आपण बंद टांग्यांतून जाऊं.

**हरिहरपंत** : अरे बापरे ! आणखी टांग्याचा खर्च बोडक्यावर बसणार का ?

**लक्ष्मीबाई** : काय झालं एखादे दिवशीं खर्च झाला तर ? इतका चिक्कूपणा कांहीं चांगला नाहीं.

**हरिहरपंत** : आपल्या नलूचं लग्न व्हायचं आहे. हात राखूनच खर्च करायला पाहिजे आपण.

**लक्ष्मीबाई** : आपण जांवयाला आठ आणे हुंडा कमी देऊं. चला बरं लवकर. नाहींतर तिकिटं मिळणार नाहींत.

**हरिहरपंत** : तिकिटं नाहींत असं होऊं नये म्हणून तर मी गुरुवार पसंत करतों. [ लक्ष्मीबाई मधल्या दाराला कुलूप लावते. दोघं जाऊं लागतात. ]

**नलिनी** : माई, दत्ताला पेढे ठेवायचे राहिले कीं ! दत्ताला आरती तरी करा !

**हरिहरपंत** : आणि आम्हीं तुम्हांला फुलांची वेणी आणली आहे, ती घाला.

**लक्ष्मीबाई** : आणली ना वेणी ? बरं झालं ! तरी मी मनांत म्हणत होतें, इकडून विसरणं होणार नाहीं !

**हरिहरपंत** : हं ! हें इकडून तिकडून पुरे. वेणी घाला नि चला.

[ लक्ष्मीबाई एक स्वतः घालते, दुसरी नलिनीच्या हातांत देते ]

**नलिनी** : आज मला सुद्धा वेणी आहे का ?

**लक्ष्मीबाई** : नीट बांध ती माझ्या आंबाड्यावर ! म्हणून दिली तुझ्या हातांत. [ नलिनी लक्ष्मीबाईच्या आंबाड्यावर वेणी घालते ] नलू, दत्ताला तूंच पेढे ठेव बरं का. आम्ही जातों. [बाहेर जाऊन खोलीचं दार लावून खिडकींतून बोलते] तूं जाऊं नकोस कुठें ! झोपून राहा शांतपणानें. [जातात]

**श्रीनिवास** : [मधल्या दाराजवळ येऊन] नलू, अहो नलू.

**नलिनी** काय ?

**श्रीनिवास** : वाघोबा नि वाघीण गेलीं.

**नलिनी** : काय ?

**श्रीनिवास** : तुमचे आईवडील गेले. मी इकडची कडी काढली आहे. तुम्ही तिकडची कडी काढून या ना !

**नलिनी** : माईनीं मधल्या दारालाही कुलूप लावलं आहे.

**श्रीनिवास** : कुलूप लावलं ? मग काय करणार ? चातक पक्ष्याप्रमाणें दिवस उगवेपर्यंत आक्रोश करीत राहाणार !

**नलिनी** : दत्तमहाराजा, तूं तरी बाहेर पडायचा एखादा इलाज सुचव.

**श्रीनिवास** : कोण ? मी सुचवूं का ?

**नलिनी** : तुम्हीं नव्हे. दत्ताची प्रार्थना करतें आहें मी. तुम्हांला तीन तोंडं आहेत का ?

**श्रीनिवास** : नाहीं. एकच आहे. नि त्या एका तोंडानें मी तुम्हांला एकच उपाय सुचवतों. तुमच्या आंतल्या खोलींतून बाहेर गॅलरींत यायचा दरवाजा आहे ना ? त्या दरवाजानें तुम्हीं बाहेर पडा.

**नलिनी** : दत्तात्रया, धन्य तुझी लीला ! [ श्रीनिवास आपली पाठ थोपटतो. नलिनी त्याच्या खोलींत जाते. ]

**श्रीनिवास** : हं ! काय आलीस ? नव्हे–आलांत ? चला, सिनेमाला जाऊंया ना ?

**नलिनी** : कसला सिनेमा ? मी तुम्हांला एक भयंकर बातमी सांगणार आहें.

**श्रीनिवास** : तें राहूं दे. तुम्हांला पाहायला कोण येणार आहेत हो ?

**नलिनी** : तीच तर भयंकर बातमी आहे. जीवनजी चाळींत सदोबा सनातने नांवाचे कुणी गलेलठ्ठ गृहस्थ राहातात. ते येणार आहेत.

**श्रीनिवास** : केव्हां ?

**नलिनी** : उद्यां रात्रीं नऊ वाजतां. ते फार सनातनी वृत्तीचे आहेत काहो ?

**श्रीनिवास** : कुणाला ठाऊक ?

**नलिनी** : उद्यांचं एवढं संकट कसंही करून निवारण झालं पाहिजे.

**श्रीनिवास** : वा ! त्यांत संकट कसलं ? तुमचं लग्न होऊन तुम्हीं पतिगृहीं नांदायला जाणार ! तुमच्या सावत्र आईच्या जाचांतून, म्हणजे डबल सासुरवासांतून मुक्त होणार ! त्यांत तुम्हांला आनंदच वाटायला पाहिजे. सनातने फार सनातन म्हणजे वयोवृद्ध असतील नि श्रीमंतही असतील.

**नलिनी** : मला काय करायचं आहे त्यांच्या श्रीमंतीशीं ? मी कांहींही करून हें लग्न मोडून टाकीन. तुम्ही मला मदत कराल का ?

**श्रीनिवास** : शांतं पापम्. लग्न मोडणं हें अत्यंत हीन असं पाप आहे.

**नलिनी** : आणि लग्न जुळवणं ?

**श्रीनिवास** : तें सर्वश्रेष्ठ पुण्य आहे.

**नलिनी** : मी तुम्हांला लग्न मोडायला नि जुळवायलाही सांगतें.

**श्रीनिवास** : [ स्वतःकडे बोट करून ] म्हणजे—तुम्हीं ?

**नलिनी** : [ श्रीनिवासाकडे बोट करून ] हो मी—मी.

**श्रीनिवास** : [ नलिनीकडे बोट करून ] म्हणजे—मी ?

**नलिनी** : [ स्वतःकडे बोट करून ] हो तुम्हीं–तुम्हीं.

**श्रीनिवास** : माझी तयारी आहे.

**नलिनी** : माझीही आहे.

**श्रीनिवास** : तुझ्या वडिलांची तयारी नाहीं ना ?

**नलिनी** : आपण समजुतीनें सांगितल्यावर ते नाहीं नकार देणार !

**श्रीनिवास** : आणि माई ?

**नलिनी** : तिला कोण विचारतं आहे ?

**श्रीनिवास** : मग हें ठरलं तर ?

**नलिनी** : ठरलं, ठरलं !

**श्रीनिवास** : काय ग ? तुझ्या वडिलांना महिना दीडशें रुपये मिळवणारा जांवई पसंत पडेल ?

**नलिनी** : त्यांना हल्लीं दरमहा तीनशें रुपये मिळत असले, तरी त्यांचं लग्न झालं तेव्हां किती मिळत होते ?

**श्रीनिवास** : किती ?

**नलिनी** : तीस रुपये रोख !

**श्रीनिवास** : मग त्या दृष्टीनें मी योग्यच म्हणायचा.

**नलिनी** : उद्यां पाहायला येणार आहेत त्याचं काय करायचं ?

**श्रीनिवास** : बोळवण करायची. नाहींच ऐकलं तर चंपी करायची.

**नलिनी** : तुम्हीं आपल्या अंगावर घेतां ती कामगिरी ?

**श्रीनिवास** : तुझी संमति आहे म्हणून घेतों.

**नलिनी** : [ दत्ताचा फोटो पाहून ] अगबाई ! दत्ताला पेढे ठेवायचे राहिलेच कीं.

**श्रीनिवास** : आतां ते मलाच दे. मीच तुझ्यापुढें दत्त म्हणून उभा राहातों. [ नलिनी पेढे आपल्या खोलींतून श्रीनिवासच्या खोलींत आणते. दोघं दत्ताला पेढे ठेवून नमस्कार करतात. ] अनसूयासूता, ह्या नलिनीला इच्छित वराची प्राप्ति होऊं दे.

**नलिनी** : दत्त महाराजा, ह्या श्रीनिवासना त्यांच्या मनाप्रमाणें वधू मिळूं दे. [ दोघेंही हसतात ]

**श्रीनिवास** : **ऋतुराजा हा, वसंत आला, घेऊं एकच तान**

**नलिनी** : **विजयि होउं दे, मीलन अपुलें, मागूं एकच दान ॥**

**श्रीनिवास** : **तुझ्या रूपानें, स्वर्ग लाभला**
**भाग्यश्रीचा, शोध लागला**
**कणाकणांतुन, मोद बहरला,**
**गेलें हरुनी भान ॥ १ ॥**

**नलिनी** : **सौभाग्याचा, अखंड ठेवा**
**जन्मोजन्मीं, लाभो देवा**
**दृष्ट न लागो, या पतिदेवा**
**होवो आयुष्मान ॥ २ ॥**

[ पद संपल्यावर नलिनी श्रीनिवासला पेढे देते ]

**नलिनी** : हे परीक्षा पास झाल्याबद्दलचे पेढे बरं का !

**श्रीनिवास** : अं हं ! हे लग्न ठरल्याबद्दलचे.

**नलिनी** : कुणाचं ?

**श्रीनिवास** : तुझं. [ श्रीनिवास नलिनीला पेढे देतो ]

**नलिनी** : हे तुमचं लग्न ठरल्याबद्दलचे वाटतं ?

**श्रीनिवास** : अं हं ! हे बँकेंत नोकरी लागल्याबद्दलचे !

[ दोघेंही हसतात. पंत व लक्ष्मीबाई प्रवेश करतात.]

**हरिहरपंत** : तरी मी म्हणत होतों, नको तो सिनेमा.

**लक्ष्मीबाई** : तिकिटं मिळालीं नाहींत त्याला आपला काय इलाज ? चार थेटरांवरून टांग्याची वरात काढली.

**हरिहरपंत** : आणि खेटरं मारल्यासारखीं तोंड करून परत आलों.

**लक्ष्मीबाई** : अहो, नलू कुठें आहे ? [ शोधते ]

**हरिहरपंत** : बहुधा गुंगारा दिला. [ पाहून ] त्याच्या खोलींत आहे.

**लक्ष्मीबाई** : ती गेली कशी ? [ आंतल्या खोलींत पाहून ] अहो, तें आंतल्या खोलीचं दार उघडं आहे. त्यांतूनच ती गेली असली पाहिजे.

**श्रीनिवास** : खरोखर आज भाग्याचा दिवस उगवला आपल्या आयुष्यांत.

**लक्ष्मीबाई** : भाग्याचा दिवस ? थांबा. आपण त्यांचं बोलणं चोरून ऐकूं या !

**हरिहरपंत** : कशाला ? चोरून ऐकणाराच्या कानीं त्याची निंदाच पडायची !

**नलिनी** : मी जातें आतां परत !

**श्रीनिवास** : एवढ्या लवकर का सिनेमा संपणार आहे ?

**लक्ष्मीबाई** : संपला ! कधींच संपला.

**हरिहरपंत** : आतां फक्त श्रुतिकाच ऐकतों आहों आम्हीं.

**श्रीनिवास** : तो बोका नि ती भाटी एवढ्यांत का परत येणार आहेत ?

[ पंत व लक्ष्मीबाई चपापतात ]

**नलिनी** : समजा तीं परत आलीं, आपल्याला इथें एकत्र पाहिलं, तर आपण काय करायचं ?

**श्रीनिवास** : तर काय करायचं ? अँ ? सासऱ्यापुढें अदबीनें वागेन मी. परंतु मी माझ्या सासऱ्याला भिणार आहें थोडाच ?

**हरिहरपंत** : सासरा ?

**लक्ष्मीबाई** : म्हणजे ?

**श्रीनिवास** : मी तोंडावर बजावीन त्याला, हिचं माझं लग्न टरलं आहे. तुम्हीं कांहींएक गडबड करूं नका.

**नलिनी** : आणि ती भाटी गुरगुरूं लागली तर !

**श्रीनिवास** : तर तिच्या अंगावर कुत्रा सोडीन. छू !

**हरिहरपंत** : तूं भाटी बरं का !

**लक्ष्मीबाई** : आणि तुम्हांला बोका म्हणतोय बरं, बोका !

**नलिनी** : हें पाहा, ह्या सगळ्या युक्त्या ऐनवेळीं फोल ठरतील.

**श्रीनिवास** : मग असं करूं. तूं नि मी, एकदम भांडायलाच लागूं.

**नलिनी** : भांडायचं ? तुमच्याबरोबर ? मी नाहीं भांडणार.

**श्रीनिवास** : अग पण लुटूपुटूचं भांडण करायला काय हरकत आहे ?

**नलिनी** : त्यालाही कांहींतरी कारण पाहिजे ना ?

**श्रीनिवास** : कांहींतरी कुसपट काढून तुझ्या माई नाहीं का तुझ्याशीं भांडत ? तसं भांडायचं !

**नलिनी** : हो ! त्या वाऱ्याबरोबर सुद्धा भांडत सुटतील !

[ लक्ष्मीबाई संतापते व पंतांना घेऊन श्रीनिवासकडे येते. श्रीनिवास व नलिनी चपापतात. ]

**श्रीनिवास** : येस येस.

**नलिनी** : नो नो.

**श्रीनिवास** : येस नो.

**नलिनी** : नो येस.

**श्रीनिवास** : नो नो.

**नलिनी** : येस येस !

**श्रीनिवास** : त्याला मी जबाबदार नाहीं.

**नलिनी** : नाहीं तर कोण जबाबदार आहे ? तुम्हीं तें केलं नसतं तर माझ्यावर हें करण्याची कशाला वेळ आली असती ?

**श्रीनिवास** : पण ही वेळ येऊं नये म्हणून तर मी तें करीत होतों.

**नलिनी** : नि त्यामुळेंच ही वेळ आणलीत तुम्हीं.

**श्रीनिवास** : मुळींच नाहीं. तुमच्याच वागणुकीनें हा प्रसंग आला.

**नलिनी** : आतां काय करणार आहांत तुम्हीं ?

**श्रीनिवास** : मी ? मी आतां तो प्रकार करीन.

**लक्ष्मीबाई** : पुरे पुरे गुंडोपंत !

**हरिहरपंत :** अहो, तुमचें तें हा ही हें नि तो ती तें पुरें करा. तुमच्या सगळ्या युक्त्या आम्ही आड्न ऐकल्या आहेत. कार्टे, तूं जी एवढी त्याच्या मागें लागलीस तें त्याच्यांत काय पाहिलंस ग ? दीडशें टिकल्या मिळवणारा छाकटा हा...

**श्रीनिवास :** दीडशें टिकल्या ! टिकल्या अं ? कांहो पंत, तुमचं लग्न झालं–पहिलं लग्न बरं का–तेव्हां तुम्हांला किती पगार मिळत होता हो ?

**हरिहरपंत :** तीस रुपये.

**श्रीनिवास :** तीस रुपये ! आणि आमच्या दीडशें टिकल्या ! तुमचे रुपये म्हणजे गाडीचीं चाकं ! आमच्या टिकल्या.

**हरिहरपंत :** हो हो टिकल्याच त्या ! नले, खबरदार ह्या टिकल्याशीं बोलशील तर. चल आपल्या खोलींत. [ आपल्या खोलींत जातात. ] ह्या पोरी काय काय युक्त्या लढवतील त्याचा नेम नाहीं. नले, आजपासून तूं त्याच्याशीं बोलतां कामा नये; त्याच्याकडे जातां कामा नये.

**नलिनी :** पण बाबा...

**हरिहरपंत :** एक चकार शब्द काढशील तर डोळ्यांपुढें सूपभर काजवे पाडीन. समजलं कीं नाहीं ? उद्यां तुला पाहायला येणार आहेत. आंत जाऊन झोपा आतां. [ नलिनी आंत जाते ] दत्ताचा प्रसाद कुटें आहे ?

**नलिनी :** [ आंतून ] मी खाऊन टाकले सगळे पेढे !

**हरिहरपंत :** सगळे पेढे खाल्लेस ?

**लक्ष्मीबाई :** किती होते पेढे ?

**हरिहरपंत :** पाव रत्तल ! तूं एकटीनें खाल्लेस इतके पेढे ? कीं कुणाला दिलेस ?

**लक्ष्मीबाई :** त्या गुंडाला दिले असतील. झोपा आतां खोलींत. पण थांब, त्या दाराला आंतून कुलूप लावतें.

[ आंत जाऊन कुलूप लावून परत येते ]

**हरिहरपंत :** सारखी पायपीट करून माझे पाय असे दुखायला लागले आहेत गळवासारखे ! कांहीं बिचारूं नका. कुणीं चेपले असते तर फार बरं झालं असतं.

**लक्ष्मीबाई :** मघांपासून झालेल्या त्रासानें माझं डोकं असं ठणकतं आहे ! कुणी तरी डोक्यावर घणाचे घाव घालतं आहे असं वाटतं ! पण कोण चेपणार माझं डोकं ?

**हरिहरपंत** : दत्तात्रया, माझे पाय चेपण्याची बुद्धि दे कुणाला तरी !

**लक्ष्मीबाई** : सर्वेश्वरा शंकरा, माझं डोकं चेपण्याची जर तूं कुणाला बुद्धि दिलीस, तर मी तुला एक हजार बिल्वपत्रं वाहीन.

**हरिहरपंत** : अग, आपण आतां कॉम्प्रमाइझ करूं या !

**लक्ष्मीबाई** : म्हणजे काय?

**हरिहरपंत** : म्हणजे असं, तूं माझे पाय चेप नि मी तुझं डोकं चेपतों.

[ पंत कॉटवर बसून लक्ष्मीबाईचं डोकं चेपतात व
लक्ष्मीबाई जमिनीवर बसून पंतांचे पाय चेपते. ]

**श्रीनिवास** : मी केवळ गरीब म्हणून पंत मला मुलगी द्यायला तयार नाहींत. तेव्हां सुखासुखी हें लग्न व्हायचं नाहीं. काय बरं युक्ति करावी त्या चिक्कट थेरड्याला चकवायला ?

**लक्ष्मीबाई** : बाकी तो शेजारचा गुंड वस्ताद बरं का !

**हरिहरपंत** : अलीकडे जिकडे तिकडे गुंडगिरीच चालू आहे. मघाशीं सिनेमा थिएटरांत काय चाललं होतं तें ? तिकिट काढायला गेलों नि कुणीतरी धक्का-दिल्यामुळें असा कोलमडलों ! डोळे पांढरे होण्याची वेळ आली होती. म्हटलं झक मारीत गेला तो सिनेमा ! आपण आपलं घर गांठावं !

**लक्ष्मीबाई** : नि म्हणूनच हे लेकीचे चाळे पाहायला मिळाले आपल्याला.

**श्रीनिवास** : [ मोठ्यानं ] आज माझे पन्नास हजार रुपये जे बँकेंत आहेत ते जर मी दुसरीकडे व्याजीं लावले तर जास्त व्याज येईल. बँक काय व्याज देणार दगड ? त्यापेक्षां ते माझे पन्नास हजार रुपयेच...

**हरिहरपंत** : ऐक. हजारांच्या गोष्टी चालल्या आहेत. [ऐकूं लागतात]

**श्रीनिवास** : त्यापेक्षां त्या माझ्या पन्नास हजार रुपयांमध्यें मी जर पुण्याला एखादा बंगला बांधला तर त्याचं भाडं तरी येईल.

**हरिहरपंत** : ऐक. हा जन्मदरिद्री माणूस ! त्याच्याकडे इतके रुपये आले कुठून ?

**लक्ष्मीबाई** : कुणाचा तरी गळा दाबून उपटले असतील. आज आपली पोरगी नाहीं उपटायला पाहात होता ?

**श्रीनिवास** : [ मोठ्यानें ] नंतर आपण एक मोटर खरेदी करूं. मला ड्रायव्हिंग येतंच आहे. संध्याकाळ झाली कीं चालले बायकोला घेऊन ' पों पों ' करीत फिरायला.

**लक्ष्मीबाई** : अहो, आतां मोटरीच्या गोष्टी. ऐका, ऐका !

**श्रीनिवास** : [ हळूच ] जीवनजी चाळींतले सदोबा सनातने नलिनीला पाहायला येणार आहेत का ? माझा मित्रच आहे तो. त्याच्याकडे जाऊन पाहातों कांहीं उपयोग झाला तर. [ मोठ्यानें ] चला, चौपाटीवरून चक्कर मारून यावं. [ बाहेर जाण्याची तयारी करूं लागतो. ]

**हरिहरपंत** : अरे लेका ! जा. आजच्या दिवस मौज करून घे.

**लक्ष्मीबाई** : त्यानें आज नक्की डल्ला मारलेला आहे.

**हरिहरपंत** : हो. हा नोकरीला बँकेंतच असतो. त्याच्याच हातून पैशांचा व्यवहार होतो. तेव्हां त्यानें नक्की कांहीं अफरातफर केली असली पाहिजे.

**लक्ष्मीबाई** : आणि म्हणूनच नलूला पळवून न्यायचा त्याचा विचार असावा.

**हरिहरपंत** : बच्चंजी, उद्यां तुझ्या बदफैलीपणाचा डांगोरा पिटतों जगभर !

**लक्ष्मीबाई** : पिटा, पिटा, अगदीं जोरानें पिटा !

**हरिहरपंत** : आतां उद्यां हेंच काम ! बँकेच्या डायरेक्टरला सांगून त्याची बँकेंतून हकालपट्टी करतों नि भय्याला सांगून चाळींतून घालवून देतों. मग पडूं दे रस्त्यावर धूळ फुंकीत !

**श्रीनिवास** : [ आपल्या खोलीच्या दरवाजाला कुलूप लावतांना ] नका गडे माझ्याकडे पुन्हा पुन्हा पाहूं । [ पंतांच्या खोलीच्या खिडकींतून वाकून पाहून ] लाजरिच्या रोपट्याला हात नका लावूं.

**लक्ष्मीबाई** : गुंड मेला ! [ खिडकी लावून घेते ]

पडदा पडतो.

# २

[ दृश्य पहिल्या अंकांतलेंच. नलिनीला जुन्या पद्धतीप्रमाणें सजविली आहे. तिच्या हातांत कोपरापर्यंत बांगड्या घातल्या असून, नऊ वारी लुगडें खोचा काढून नेसवलें आहे व कपाळाला अंबाबाई छाप कुंकू लावलें आहे. श्रीनिवास धोतर नेसला आहे. त्यानें पुढें खिसा असलेला सदरा घातला असून तो कृत्रिम दाढी मिशी लावीत आहे असा पडदा उघडतो. ]

**लक्ष्मीबाई** : ( प्रवेश करून ) नलू हें काय ? सनातने येण्याची वेळ झाली आणि तुझी मात्र कांहींच तयारी झालेली नाहीं !

**नलिनी** : आणखी काय तयारी करायची ? चांगली काकूबाई दिसायला लागलें कीं ! तेवढं पुरे नाहीं का ? का आजीबाईच दिसायला पाहिजे ?

**लक्ष्मीबाई** : इथें बस ! मग सांगतें तुला. [ नलिनी लक्ष्मीबाईकडे तोंड करून बसते. ] अग पाठ कर माझ्याकडे !

[ लक्ष्मीबाई नलिनीची वेणी घालूं लागते ]

**नलिनी** : अयाई ! आईग !

**लक्ष्मीबाई** : काय झालं किंचाळायला ?

**नलिनी** : केवढ्यानं केस ओढतां ? चडचडले केस माझे. अन् किती घट्ट वेणी ही ?

**लक्ष्मीबाई** : आमच्या खेडेगावांत केस इतके घट्ट बांधतात नि त्यांना इतकं तेल चोपडतात कीं वेणी घातल्यावर ' डोक्याला काळा रंग लावला आहे कीं काय ' असा भास होतो.

**नलिनी** : अरे बापरे !

**लक्ष्मीबाई** : हां ! मुलींनीं ' अरे बापरे ' नाहीं म्हणायचं.

**नलिनी** : कां ? त्यांना बाप नसतो ?

**लक्ष्मीबाई** : [ नलिनीच्या पाठीवर चापट मारून ] नले !

**नलिनी** : तुमच्या खेडेगावांत...

**लक्ष्मीबाई** : आनंद झाला, तर मुली ' अगबाई ', दुःख झालं तर ' अग बाई ग ', आणि आश्चर्य वाटलं तर ' अग्गो बाई ' असं म्हणतात. लक्षांत ठेव. नलू , वेणीच्या टोकाला लावायची लोकर कुठं आहे ?

**नलिनी** : लोकर कशाला ? गोंडा लावा ना.

**लक्ष्मीबाई** : गोंडा लावून शेपटा नाहीं सोडायचा, लोकांनीं घोळायला ! लोंकर लावून खोपा घालायचा आहे. [ खोपा घालून होतो. नलिनी उठून जाऊं लागते ] हं ! असं नुसतं नाहीं जायचं. मला प्रथम नमस्कार करायचा.

**नलिनी** : तो कां ?

**लक्ष्मीबाई** : मी तुझी वेणी घातली ना, म्हणून. हं. कर नमस्कार [ नलिनी उभ्यानें नमस्कार करते. ] असा नाहीं. नीट खालीं वाकून कर. [ वाकून नमस्कार करते ] अस्सा !

**नलिनी** : माई, नमस्कार केल्यावर आशीर्वाद नाहीं का द्यायचा ?

**लक्ष्मीबाई** : ह्या नमस्काराला नाहीं द्यायचा.

**नलिनी** : अग्गोऽबाई !

**लक्ष्मीबाई** : कां ? अग्गोबाई कां म्हटलंस ?

**नलिनी** : मला आश्चर्य वाटलं तुमच्या उत्तराचं.

**लक्ष्मीबाई** : बरोबर म्हटलंस. शहाणी आहेस. लक्षांत ठेव. अगबाई, अगबाईग नि अग्गोबाई !

**नलिनी** : माई, बाबा कुठें दिसत नाहींत ?

**लक्ष्मीबाई** : त्या सदोबा सनातन्याला आणण्यासाठीं, चाळीच्या दरवाजाजवळ उभे आहेत. [ पंत प्रवेश करतात ] अगबाई !

**नलिनी** : अग्गोबाई !

**लक्ष्मीबाई** : चुकलं ! आतां तुला आश्चर्य नाहीं वाटलं. आनंद झाला फक्त. आले का सनातने ?

**हरिहरपंत** : नाहीं अद्याप ! स्टँडर्ड टाइमप्रमाणं ते केव्हांच यायला पाहिजे होते. सनातने आहेत ते ! तेव्हां ते बहुधा सनातन—मुंबई टाइमप्रमाणं येतील. हं ! नलू, कशी काय सजली आहेस पाहूं ? वा ! सनातन, फार उत्तम ! आमच्या ह्यांचं कौशल्य ना हें ? मग काय पाहायलाच नको ! आतां बोलण्याचालण्यांतला, वागण्यावर्तणुकींतला सगळा सुधारकी थाट नि घाट काढून टाकून, दुर्धारकी म्हणजे सनातनी पद्धत अमलांत आणायची.

**नलिनी** : म्हणजे हो काय करायचं बाबा !

**हरिहरपंत** : तुला पाहिल्या बरोबर त्यांना अखिल आर्य स्त्रियांच्या अंगीं आढळणाऱ्या, नम्रता, शालीनता, कुलीनता, असहायता, अबलता, वगैरे यच्चयावत सद्‌गुणांचं एकसमयावच्छेदेंकरून दर्शन झालं पाहिजे.

**नलिनी** : असहायता, अबलता, ह्यांची सुद्धा सद्‌गुणांतच भरती करायची का ?

**हरिहरपंत** : नलू, आर्य स्त्रियांविषयीं बोलतों आहें मी. हे सद्‌गुण तर सनातन आहेत.

**नलिनी** : ह्यापेक्षां दुबळेपणा, बावळटपणा असं कां नाहीं म्हणत ?

**हरिहरपंत** : नलू, नलू, हें आर्य स्त्रीचं लक्षण नव्हे. पोरी, जगांतल्या एकूणएक सद्‌गुणांचं तूंच उगमस्थान आहेस, असं त्यांना वाटायला नको का ? थोडक्यांत सांगायचं, म्हणजे देशोदेशींच्या कुलस्त्रियांनीं आपापल्या कुलीनतेची कसोटी पाहाण्यासाठीं पाठवलेल्या सद्‌गुणांच्या शिष्टमंडळाची तुझ्या मुखमंडळावर एखादी

त्यास बैठक तर चालली नाहीं ना, असा तुला पाहिल्या बरोबर त्यांना भास व्हायला पाहिजे. आलं लक्षांत ?

**नलिनी** : अग बाईग !

**लक्ष्मीबाई** : कां ग ? तुला दुःख का झालं ?

**नलिनी** : हो. आतां बाबांनीं जें कांहीं सांगितलं तें माझ्या लक्षांतच राहाणार नाहीं. म्हणून सनातने येतांच मी त्यांच्याकडे पाठ करून बसेन.

**हरिहरपंत** : छे छे ! तसं होता कामा नये. वेडे पोरी, तूंच नंतर मला बोल लावशील, कीं बाबांनीं माझ्या पाठीमागें माझं लग्न ठरवलं ! तें व्हायला नको. तुझ्या समक्ष काय तें होऊं दे. आणि मी सांगितल्याप्रमाणें जर तूं वागलीस...

**नलिनी** : तसं वागणं जमेल असं मला नाहीं वाटत.

**हरिहरपंत** : अहो, सांगा सांगा तिला आपण कसं काय केलं होतंत तें !

**लक्ष्मीबाई** : इश्श ! आम्हांला काय येतंय ?

**हरिहरपंत** : वा ! त्यातलं कांहीं येत असल्याशिवाय का आम्हांला भुरळ पडली ? हं, सांगा, सांगा लवकर.

**लक्ष्मीबाई** : बरं; सांगतें. नलू, समज, मीच तो सनातने. हा पाहा मी खोलींत आलों. मला पाहिल्यावर हे काय म्हणतील ?

**हरिहरपंत** : [ मोठ्यानें ] या, या सनातने या, बसा !

**श्रीनिवास** : काय सद्या आला ? मग, ' मी जाणार नाहीं; तूं माझा वेष घेऊन गेलास तरी हरकत नाहीं, तुझं जर तिच्यावर प्रेम आहे तर मी तुलाच चान्स देतों ' असं मला सांगितलं तें खोटं कीं काय ?

**हरिहरपंत** : बसा, सनातने बसा !

**श्रीनिवास** : [ मधल्या फटींतून पाहून ] ओहो ! हे सनातने काय ?

**हरिहरपंत** : नंतर आंतून चहा यायचा आणि आमच्या हवापाण्याच्या गोष्टींना सुरुवात व्हायची !

**लक्ष्मीबाई** : नंतर सदोबा मुलीला बाहेर आणायला सांगतील. [ ऐटींत पंतांकडे पाहून ] अहो पंत, तुमच्या मुलीला बाहेर बोलवा.

**हरिहरपंत** : बाळ नलू, जरा आंतून बाहेर ये पाहूं ! हं ये आतां.

**लक्ष्मीबाई** : अन् आल्याबरोबर प्रथम नमस्कार ठोकायचा. नि मीं खालीं बस म्हटल्याशिवाय बसायचं नाहीं ! [ नलिनी जोरानें चालत येते. ] छे छे ! असं धडंधडाका नाहीं चालायचं. अगदीं हळुवार पावलं टाकायचीं. [ नलिनी पुन्हा जोरानें चालत येते. ] असं नाहीं ग चालायचं ! अग पायाखालीं मुंगी सापडली, तर ती सुद्धा चिरडतां कामा नये.

**हरिहरपंत** : सनातने, तुम्हींच चालून दाखवा एकदा !

[ लक्ष्मीबाई चालून दाखवते. ] यंत्र ! [ श्रीनिवास दचकतो. नलिनी लक्ष्मीबाई-प्रमाणें चालून दाखवते. ]

**लक्ष्मीबाई** : हं ! बस खालीं. [ नलिनी मान वर करून बसते ] मान इतकी वर नाहीं ठेवायची. अगदीं ढोपरांत घालायची. तुझा फक्त खोपाच त्यांना दिसायला हवा.

**हरिहरपंत** : हो. आणि ह्या डोक्याच्या लंबगोलावर, हें चाक कसं उभं राहिलं आहे, नि तें कसलं आहे, ह्याचाच त्यांना प्रश्न पडायला हवा !

**लक्ष्मीबाई** : त्यांच्या देखत उंचावर नाहीं, बसायचं. नाहींतर तूं बसशील आपली खुर्चीवर. आणि हें बघ, त्यांनीं कोणतीही गोष्ट विचारली, तरी ती आपल्याला येत नाहीं असं म्हणायचं नाहीं.

**हरिहरपंत** : एवढं केलंस, म्हणजे तूं सनातने झालीस असंच समज.

**लक्ष्मीबाई** : अजून कसे नाहीं येत सनातने ?

**हरिहरपंत** : मुंबई टाइमप्रमाणें ते आतां पांच दहा मिनिटांतच यायला पाहिजेत. शिरा तयार आहे ना ?

**लक्ष्मीबाई** : तो केव्हांच तयार करून ठेवला आहे. आतां फक्त चहा केला म्हणजे झालं.

**हरिहरपंत** : चहा ? सनातने आहे तो. कॉफी कर त्याच्याकरतां.

**लक्ष्मीबाई** : तो येतांच हाक मारा आम्हांला. आम्हीं आंतल्या खोलींत बसतों. [ लक्ष्मीबाई व नलिनी आंत जातात ]

**हरिहरपंत** : आणि मी सुद्धां जरासा पासलतों. [ दरवाजाकडे पाय करून कॉटवर झोपतात ]

**श्रीनिवास** : आतां सदोबा सनातने यायचा, तो ह्या बाजूनें आला पाहिजे. कारण ह्या बाजूला जिना नाहीं. अन् तो लवकर यायला पाहिजे. [ बाहेर येऊन ब्लॉक नं. २ च्या दरवाजावरून धावत लपत जातो. पंत त्याला पाहतात. ]

**हरिहरपंत** : कोण, कोण धावत गेला तो ? [ पाहून ] सनातनेच हा. सनातने. अहो सनातने, इकडे, इकडे, ही खोली. [ त्याला घेऊन येतात ] असे पळून काय जातां ? वा ! तुम्ही इकडून कसे आलांत ?

**श्रीनिवास** : [ आवाज बदलून बोलतो ] कां ? तिकडून कुणी येऊं नये असा कायदा आहे कीं काय ?

**हरिहरपंत** : तसा कायदा कांहीं नाहीं. परंतु तिकडे जिना नाहीं म्हणून...

**श्रीनिवास** : जिन्याकरतां अडून बसणारा हा वीर नव्हे. जिना कुठें आहे, कसा आहे हें मी कशाला पाहायला जातों. मी खांबावरून चढून आलों.

**हरिरपंत** : म्हणजे तुम्ही विसाव्या शतकांतले तानाजी मालुसरेच आहांत म्हणायचे !

**श्रीनिवास** : [ नमस्कार करून ] नरवीर मालुसरे, माझा तुला शतशः प्रणिपात !

**हरिहरपंत** : पूर्वजांविषयीं किती ही आदरबुद्धि ! बसा. बसा खुर्चीवर.

**श्रीनिवास** : आम्हीं ? अन् खुर्चीवर बसायचं ? घोड्यावर बसण्याची हिंमत धरली पाहिजे आपण. खुर्चीवर कसले बसतां ?

**हरिहरपंत** : पण इथें घोडं कसं आणायचं ? तेव्हां खुर्चीवर—[ दोघेही खुर्चीवर बसतात. लक्ष्मीबाई ट्रेमधून कॉफी आणून दोघांना देते. ]

**श्रीनिवास** : बहुधा हेंच आमचं भावी कुटुंब दिसतं.

**हरिहरपंत** : नाहीं. ते आमचं कुटुंब. [ कॉफी पितांना ] हवा काय कुंद पडली आहे !

**श्रीनिवास** : पावसाळा सुरू झाला आहे ना !

**हरिहरपंत** : रोगराई सुरू होते ती अशाच वेळीं.

**श्रीनिवास** : ऊं ! रोगराईला भिणारे आम्ही नव्हत. आमच्यापासून रोग दूर पळून जातात, आपण होऊन. [ कॉफी पिऊन होते. कपबशा घेऊन लक्ष्मीबाई आंत जाते. ]

**हरिहरपंत** : आजकालच्या तरुणांत, ही डेअरवृत्ति दिसतच नाहीं. आजकालच्या तरुणांविषयीं आपलं काय मत आहे ?

**श्रीनिवास** : मी नाहीं समजलों आपल्या बोलण्याचा अर्थ !

**हरिहरपंत** : त्यांनीं कोणत्या सुधारणा कराव्यात असं वाटतं आपल्याला ?

**श्रीनिवास** : तुम्हीं माझी मुलाखत घेत आहांत, परीक्षा घेत आहांत, का हजेरी घेत आहांत ?

**हरिहरपंत** : तसं कांहीं नाहीं. तसं कांहीं नाहीं.

**श्रीनिवास** : मग मी केव्हांचा इथं येऊन बसलों आहे, पण मा सावज कुठं दिसत नाहीं ?

**हरिहरपंत** : सावज ?

**श्रीनिवास** : म्हणजे आपलं हें —लक्ष्य—टारगेट—[ पंत विचारांत पडतात ] अहो तुमचं कन्यारत्न.

**हरिहरपंत** : हां हां ! [ आंत पाहून ] बाळ नलू, जरा बाहेर ये पाहूं.

[ नलिनी जोरानें चालत येते ]

**लक्ष्मीबाई** : [ नलिनीच्या मागोमाग प्रवेश करीत हळूच ] हळू चाल. प्रथम नमस्कार कर. [ नलिनी श्रीनिवासाला नमस्कार करते ]

**श्रीनिवास** : सत्वर मम भार्या भव.

**हरिहरपंत** : काय हा आशीर्वाद ?

**नलिनी** : अगोबाई ! [ नलिनी हसूं लागते. पंत ' नको ' म्हणून खुणवितात ]

**श्रीनिवास** : अशा उभ्या कां ? [ नलिनी पंतांकडे पाहाते. ते तोंड फिरवितात ] अशा उभ्या कां ? काहो राव...

**हरिहरपंत** : मला पंत म्हणतात. राव नाहीं.

**श्रीनिवास** : पंत म्हणतात काय ? वा ! पंत—पंत प्रतिनिधि ! काहो पंत, ह्यांचे गुडघे मोडत नाहींत वाटतं ?

**हरिहरपंत** : हो हो ! मोडतात कीं !

**लक्ष्मीबाई** : बाळ नलू, बस खालीं.

**नलिनी** : त्यांनीं ‘ खालीं बसा ’ म्हटल्या शिवाय कशी बसूं ?

[ पंत नलिनीला खालीं बसायला सांगतात. ती बसत नाहीं. ]

**श्रीनिवास** : काहो पंत, या खालीं कां बसत नाहींत ? अहो खालीं बसा. [ नलिनी एकदम बसते ] तिथें नको. खुर्चीवर बसा. [ नलिनी पंतांकडे व लक्ष्मीबाईकडे आळीपाळीनें पाहाते. तीं मानेनें नकारदर्शक अर्धवर्तुळ देतात ] पंत, हल्लीं मुंबईंत मानेचा रोग आलेला दिसतो आहे !

**हरिहरपंत** : कशावरून ?

**श्रीनिवास** : आपण सारख्या माना वेळावतां आहांत त्यावरून ! अहो खुर्चीवर बसा ना !

**नलिनी** : इथं तिसरी खुर्ची नाहीं.

**श्रीनिवास** : [ पंतांकडे पाहून ] मग ह्यांची घ्या.

**हरिहरपंत** : अयाई ! आय् !

**श्रीनिवास** : पंत, चटकन खुर्ची द्या. नाहींतर मी सुद्धां खालीं बसेन. [ पंत जमिनीवर बसतात. नलिनी खुर्चीवर बसून पायांच्या बोटांकडे पाहाते ] पायाचीं बोटं मोजतां आहांत कीं काय ?

**नलिनी** : नाहीं.

**श्रीनिवास** : जरा वर बघा बरं. [ नलिनी वर पाहात नाहीं. ] मुलगी अगदींच साधी आहे.

**हरिहरपंत** : म्हणजे आपली ही—बाळबोध.

**श्रीनिवास** : तुमचं नांव काय ?

**नलिनी** : माझं नांव ? नांव माझं ? माझं नांव नलिनी. [ वेड्या मुलीप्रमाणें चेहेरा करते ]

**लक्ष्मीबाई** : नीट बोल, नीट बोल.

**श्रीनिवास** : तुम्हाला भाऊ ?

**नलिनी** : नाहीं. अगबाईग, नाहीं.

**श्रीनिवास** : बहीण ?

**नलिनी** : नाहीं. अगबाईग, नाहीं.

**श्रीनिवास** : आई ?

**नलिनी** : नाहीं. अगबाईग, नाहीं.

**श्रीनिवास** : बाप तरी ?

**नलिनी** : नाहीं. असून नसल्या सारखाच. अग बाईग !

**हरिहरपंत** : नाहीं कसा ? हा मी आहें कीं !

**श्रीनिवास** : बरं ह्यांचं शिक्षण ?

**हरिहरपंत** : शिक्षण कसलं ? झालं आहे आपलं संसारापुरतं !

**श्रीनिवास** : म्हणूनच ही अशी म्हाळसा दिसते. हल्लींच्या जगांत शिक्षण म्हणजे जरा...

**हरिहरपंत** : नाहीं. तसं तिचं शिक्षण बरंच झालं आहे.

**श्रीनिवास** : मग आतां संसारापुरतं झालं आहे, असं कसं म्हटलंत ?

**हरिहरपंत** : म्हणजे बरंच चांगलं संसारापुरतं झालं आहे, असा माझ्या म्हणण्याचा हेतु होता.

**श्रीनिवास** : तुम्हीं एकट्या प्रवास करूं शकतां का ?

**हरिहरपंत** : एकट्यानें प्रवास ? छे हो ! आमची नलू शेजारच्या चाळींत सुद्धा एकटी जायला धजत नाहीं.

**श्रीनिवास** : शेजारच्या बिऱ्हाडांत ?

**हरिहरपंत** : काय, काय म्हणालांत ?

**श्रीनिवास** : ही फार भित्री मुलगी आहे.

**हरिहरपंत** : नाहीं हं ! तशी वेळ आली तर ती लंडनला सुद्धा एकटी जाईल. काय नलू ?

**श्रीनिवास** : तशी वेळ म्हणजे कोणती ? पळून जायची ?

**हरिहरपंत** : नलू ? आणि पळून जाणार ?

**नलिनी** : मी खोलींत सुद्धा एकटी राहायला भिते !

**हरिहरपंत** : घ्या. तिच्याच तोंडून ऐका.

**नलिनी** : अन् त्यामुळें, बाहेर जातांना, माई नि बाबा, दाराला बाहेरून कुलूप लावून जातात.

**श्रीनिवास** : वा वा ! अशी मुलगी मला पसंत पडेल.

**हरिहरपंत** : तुम्हांला पसंत पडायचीच ती ! ही अशी स्वभावानें गरीब असल्यामुळें, तुम्हांला सोडून ती कुठें जाणारच नाहीं.

**श्रीनिवास** : पंत, ह्यांना मोडी वाचतां येतं का ?

**हरिहरपंत** : मोडी ? ती शाळेंत जाऊन विशेष शिकलेलीच नाहीं...

**लक्ष्मीबाई** : मोडी वाचणं कांहीं फारसं कठीण नाहीं.

**श्रीनिवास** : त्यांना तें येतं का ?

**नलिनी** : येतं. अगबाई येतं !

**हरिहरपंत** : तिचं मोडी अक्षर असं पाणीदार आहे...

**श्रीनिवास** : पाणीदार अक्षर कसं असतं बुवा ?

**हरिहरपंत** : अहो मोत्यासारखं गोल आहे, म्हणून पाणीदार म्हटलं ! एकदा ओळीला सुरुवात केली, कीं शेवटालाच थांबायची–श्रीमंत सकल गुणालंकृत, अखंडित राजलक्ष्मी विराजित राजमान्य राजेश्री...

**श्रीनिवास** : मला वाचून दाखवा बरं मोडी !

**हरिहरपंत** : नलू, तें पुस्तक आण टेबलावरचं !

[ नलिनी व लक्ष्मीबाई टेबलाजवळ जातात ]

**लक्ष्मीबाई** : [ चटकन एक पुस्तक घेऊन ] घे. हें घे !

**नलिनी** : हें बाळबोध पुस्तक आहे.

**लक्ष्मीबाई** : तेंच वाच मोडीसारखं. चल बस खुर्चीवर.

**नलिनी** : [ खुर्चीवर बसून ] धडा सव्वीसावा. एका कावळ्याची युक्ति. एका कावळ्याला एकदा फार तहान लागली.

**श्रीनिवास** : [ वाकून पाहून ] हें तर बाळबोध पुस्तक आहे.

**हरिहरपंत** : मी खरं सांगूं का ? आमच्याकडे मोडी पुस्तक नाहीं.

**लक्ष्मीबाई** : नलूच्या आजोबांचं परवां आलेलं पत्र मोडीत लिहिलेलं आहे ना ?

**हरिहरपंत** : हो. बरी आठवण केलीस. आण बरं [ तें पत्र देते ]

**नलिनी** : [ वाचते ] चि. रा. रा. हरिहरपंत ह्यांस अ. आ. वि. वि. आपलें कुशल पत्र पावलें. चि. नलू यंदां मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाली, हें वाचून फार आनंद झाला.

**श्रीनिवास** : ह्यांचं शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालं असून, मला खोटं सांगून फसवायला पाहातां काय ? ह्या सनातन्याजवळ असं वर्तन ?

**हरिहरपंत** : अहो, ती मॅट्रिक झालेली नाहीं. [ पत्र दाखवून ] हें पाहा मा–त्री–क, मात्रिक असं आहे लिहिलेलं. ही एक मोडीचीच परीक्षा आहे.

**श्रीनिवास** : मग हरकत नाहीं. मुलगी आतां आंत गेली तरी चालेल. परंतु त्यांना मला कांहीं प्रश्न विचारायचे असले, तर विचारूं द्या.

**हरिहरपंत** : तिला कांहीं विचारायचं नाहीं.

**लक्ष्मीबाई** : नलू, चल आंत.

**नलिनी** : मला फक्त एकच प्रश्न विचारायचा आहे.

**हरिहरपंत व लक्ष्मीबाई** : तुला कांहींएक विचारायचं नाहीं. तूं आंत जा.

**श्रीनिवास** : विचारूं द्या तिला प्रश्न !

**नलिनी** : म्हटलं, तुम्हीं ही दाढी केव्हां काढणार ?

[ लक्ष्मीबाई नलिनीला ओढीत आंत नेते ]

**श्रीनिवास** : [ हंसून ] वेळ आली म्हणजे काढूं. ठीक आहे पंत, आम्हीं कळवतों उद्यां परवां आमचं मत.

**हरिहरपंत** : शक्य तितक्या लवकर हं ! तेवढं पुढचीं बोलणीं करायला बरं. [ श्रीनिवास नमस्कार करून जातो ] धडा सव्विसावा. एका कावळ्याची युक्ति ! तो धडा कशाला काढलास ? आणि प्रश्नांचीं उत्तरं देतांना, अगबाई, अगबाईग, असं म्हणत होतीस तें कशासाठीं ? अगबाई ह्याचा अर्थ काय ? [ श्रीनिवास आपल्या खोलींत जाऊं पाहातो. त्याला पाहून ] कांहो ? परतसे फिरलांत ?

**श्रीनिवास** : [ पायाकडे बोट दाखवून ] माझ्या वाहाणा घालायच्या राहिल्या. [ नमस्कार करून जातो ]

**हरिहरपंत** : आणि प्रश्न काय विचारला ? म्हणे तुम्हीं दाढी केव्हां काढणार ?

तुला काय करायचं आहे त्याच्या दाढीशीं ? उद्यां त्यानें नकार दिला म्हणजे झाला सगळा घोटाळा ? [ श्रीनिवास पुन्हा खिडकींत दिसतो ] कां हो ? इथें घोटाळतासे ? मुलगी पसंत आहे असं आतांच सांगाना ! दोन दिवसांचा अवधि कशाला ?

**श्रीनिवास :** तुम्हीं आमच्या अंतरींच्या भावना ओळखल्या म्हणायच्या !

**हरिहरपंत :** चोराच्या खुणा चोर जाणे.

**श्रीनिवास :** तुम्हीं आम्हीं चोर अं ?

**हरिहरपंत :** तसं नव्हे. मीं एक म्हण सांगितली. अन् ह्यावरून मला आमच्या शेजाऱ्याची आठवण झाली. ह्या खोलींत, श्रीनिवास नांवाचा एक ब्रह्मचारी तरुण राहातो. बडा बदमाष गुलाम, बरं का !

**श्रीनिवास :** त्याची तुमच्या मुलीवर नजर असेलच.

**हरिहरपंत :** नजर नाहीं. डोळा आहे डोळा ! पण त्या जन्मदारिद्र्याला, मी थोडाच मुलगी द्यायला तयार होणार ! म्हणून त्यानें केलं काय कीं तो ज्या बँकेंत नोकरीला असतो, त्या बँकेंतल्या पैशांवर चांगला आडवा उभा हात मारून श्रीमंत झाला.

**श्रीनिवास :** श्रीमंत झाला ना ? मग त्याला तुम्हीं आपली मुलगी देणारच !

**हरिहरपंत :** माझी मुलगी, अन् त्याला ? कधींही देणार नाहीं. आजन्मांत देणार नाहीं. चोर, लफंग्या, डाकू तो ! उद्यां त्याच्या हातांत हातकड्या पडून तो चतुर्भुज होईल.

**श्रीनिवास :** असं ?

**हरिहरपंत :** हो. ही गोष्ट मला काल रात्रीं कळली. वास्तविक हें तुम्हांला सांगायची जरूर नाहीं. परंतु उद्यां तुम्ही आमचे जांवई होणार. होणार का नाहीं ? होणारच ! तेव्हां तुम्हाला सांगायला हरकत नाहीं. काल रात्रीं ही गोष्ट मला कळल्याबरोबर आज सकाळींच त्या बँकेंत गेलों. मॅनेजिंग डायरेक्टरांच्या कानावर ही गोष्ट घातली. त्यांना धोक्याची सूचना दिली. त्याबरोबर डायरेक्टर जो कांहीं उसळला म्हणता ? त्याला तसाच सोडला नि मी परत फिरलों. उद्यां त्याला नोकरीवरून बडतर्फ केल्याचा हुकूम येईल.

**श्रीनिवास :** तो तुमचा शेजारी ना ? चांगलाच शेजारधर्म पाळलात.

**हरिहरपंत :** आज सबंध दिवसभर घरांत दिसला नाहीं. बहुधा गेला. आंत आहे कीं काय तें पाहूं या अं. ! [ फटींतून पाहून ] गेला. मारला गुंगारा.

**श्रीनिवास :** तुम्हांला भ्याला तो. ठीक आहे. मी जातों आतां.

**हरिहरपंत :** बरं आहे. उद्यांच कळवा आपलं मत [ श्रीनिवास नमस्कार करून जातो ]

**लक्ष्मीबाई :** [ प्रवेश करून ] गेले का सनातने ?

**हरिहरपंत :** हो हो ! गेले ! तूं शिरा दिला नाहींस त्याना.

**लक्ष्मीबाई :** अग बाईग ! अगदींच कशी विसरलें ती ? आतां तो शेराचा शिरा फुकट जाणार !

**हरिहरपंत :** मी असतांना फुकट कसा जाईल ? चल, मी टाकतों चापून सगळा. [ आंत जातात. श्रीनिवास लपत छपत आपल्या खोलींत जातो ]

**श्रीनिवास :** [ वेष बदलतांना ] माझी अशी बदनामी करतो काय थेरडा ? कालची बोलाचीच श्रीमंती, अशी अंगाशीं यावी ना ? माझ्या संसाराचं चित्र, मी मनांमध्यें रंगवायला सुरुवात करण्याआधींच तें पुसलं जावं का ? दैवदुर्विलास तो हाच. आतां नलिनीची प्राप्ती होणं कठीणच. नल् —

## पद

**होइल कैसा, तुजविण सखये, सौख्याचा संसार ?**
**देइल मजला, कोण तुझ्याविण, प्रेमानें आधार ?**
**वाट पाहतां, निशा संपली, चित्तचंद्रिका, नाहीं उदेली.**
**सुखस्वप्नांची, आशा सरली चोहींकडे अंधार ॥ १ ॥**
**सूर्य उगवतां, फुले कमलिनी, चकोर नाचे, चंद्रा पाहुनी**
**तशी तुजमुळें, स्फूर्ती मिळुनी साहिन कठिण प्रहार ॥ २ ॥**

छे ! आतां जाऊन त्याच्या तोंडावर जाब विचारूं का ? पण नको. तो म्हणायचा ' मीं आग लावली कशावरून ? ' बस्स असंच करावं. [ मोठ्यानें ] या या या ! ए दोस्ता आंत ये ना ! [ आवाज बदलून नाकांत बोलतो ] आंत येण्याची कांहींच जरूरी नाहीं. तुझ्यासारख्या एका लफंग्याबरोबर मी मैत्री केली ह्याचं मला फार वाईट वाटतं !

**हरिहरपंत** : [ बाहेर येऊन ] अग, अग इकडे ये. [ पंत व लक्ष्मीबाई भिंतीला कान देतात ]

**श्रीनिवास** : [ नेहमींच्या आवाजांत ] काय मी लफंग्या ? ते जाऊं दे. तूं आधीं आंत ये बरं. [ आवाज बदलून ] हो हो. तूं लफंग्या. किती रकमेवर डल्ला मारलास काल ? अं ? डायरेक्टरना सगळ्या गोष्टी कळल्या आहेत. आणि तूं किती रकमेची अफरातफर केलीस त्याचा शोध चालला आहे आज दिवसभर. आतां मुद्दा पुरावा पटला म्हणजे कैदखानाच पाहावा लागेल तुला.

**हरिहरपंत** : चोहोंबाजूंनीं आग तर छान लागली. आतां भडका उडायला कितीसा वेळ लागणार ?

**श्रीनिवास** : पण हा आगलाव्या कोण ?

**हरिहरपंत** : तें तुला काय करायचं आहे ?

**श्रीनिवास** : ( आवाज बदलून ) तुझे शेजारी कोणी हरिहरपंत आहेत ना ? तेच आले होते ऑफिसांत सर्व सांगायला.

**हरिहरपंत** : अर्रर्र ! हें वाईट झालं !

**श्रीनिवास** : [ आवाज बदलून ] तेव्हां तुझा माझा जो एकत्र काढलेला फोटो आहे, तो दे मला. [ नेहमींच्या आवाजांत ] कारे कां ? [ आवाज बदलून ] तूं आहेस चोरी केलेली. तुझा माझा एकत्र फोटो पाहून, लोक मला चोराचा भागीदार समजायचे. दे तो फोटो. [ नेहमींच्या आवाजांत ] बरं बरं ! मला काय करायचा तो फोटो. हा घे. मित्रा, ह्या तुझ्या सूचनेबद्दल मी तुझा फार आभारी आहें. हें पाहा, आतां जातांना ह्या बाजूनें न जातां ह्या बाजूनं जा. जरूर पडल्यास एकदम उडी मारून जा. परंतु ही डावी बाजू टाळ. [ जाण्याचे आवाज ] आतां मात्र मी पुरा निराधार झालों. आज मी बँकेंत सिकनोट पाठवून घरीं राहिलों तेवढ्यांत ह्या म्हातारड्यानें एवढं कारस्थान केलं काय ? अरेरे ! आतां माझ्या नांवावर दुसराच कुणी तरी अफरातफर करायचा. आणि त्याचं प्रायश्चित्त मात्र मला भोगावं लागणार.

**हरिहरपंत** : आले; वळणावर आले ! मोठ्या फुशारक्या मारीत होता नाहीं का ?

**श्रीनिवास** : ह्या शेजारच्या बुद्दुकाला एवढा उपद्व्याप करण्याचं कारण काय ?

**हरिहरपंत** : चोराचा शेजार नको आहे मला !

**श्रीनिवास** : मी काय त्याच्या बापाचे चार चवल खाल्ले होते ?

**हरिहरपंत** : माझ्या बापाचं तूं कांहीं केलं नव्हतंस पण माझी मुलगी तर लाटायला पाहात होतास ना ?

**नलिनी** : [ प्रवेश करून ] माई, अहो माई ?

**लक्ष्मीबाई** : अग गप !

**हरिहरपंत** : तिला आंतल्या खोलींत ढकल बरं !

**लक्ष्मीबाई** : मी ऐकतें आहें. तुम्हींच उठा ना !

**हरिहरपंत** : अन् मी काय करतों आहें ?

**नलिनी** : माई, बाबा, तुम्हीं अशीं भिंतीला कान देऊन कां उभीं ?

**हरिहरपंत** : अग गप ग ! [ गप बस नाहींतर मारीन असं खुणेनें सांगतात ]

**श्रीनिवास** : ठीक आहे. लवकरच त्याचा कांटा काढतों.

**हरिहरपंत** : कोणाचा ? माझा ?

**श्रीनिवास** : मी त्याच्या पोरीशीं बोललों, म्हणून त्या हऱ्याहऱ्यानें माझी अशी बदनामी करावी काय ? ठीक आहे पंत, भरलींच तुमचीं शंभर वर्षे !

[ पंत हताश होतात ]

**हरिहरपंत** : पण केव्हां माझा कांटा काढणार हा ?

**श्रीनिवास** : हा सिनेमाला जाईल.

**हरिहरपंत** : आजपासून सिनेमा बंद.

**श्रीनिवास** : रात्रीं पेढे आणायला जाईल.

**लक्ष्मीबाई** : गुरुवार, सोमवार बंद.

**श्रीनिवास** : आंकडे खेळायला जाईल; किंवा रात्रीं अपरात्रीं, गल्लीबोळांतून बायकांचीं तोंडं बघत हिंडत असेल.

**लक्ष्मीबाई** : का हो ? इश्श ! जळ्ळं मेलं तुमचं हें !

**श्रीनिवास** : अशा वेळीं एकटा गांठून त्याचा गळा दाबीन. ह्या पिकलेल्या पानाला खुडायला कितीसा वेळ लागणार ? दाबतों गळा नि देतों गटारांत फेकून.

माझ्या तोंडांतला घांस काढलास. मी तुझं तोंडच बंद करतों. [ मोठा आवाज करतो. पंत घेरी येऊन पडतात ]

**लक्ष्मीबाई :** अगबाई ग ! नलू नलू, पाणी आण लवकर. [ पंतांच्या तोंडावर पाणी शिंपडतात. पंत शुद्धीवर येतात ]

**हरिहरपंत :** खून होणार. माझा खून होणार ! काय करूं मी आतां ?

**लक्ष्मीबाई :** अहो, अहो हें काय ?

**हरिहरपंत :** चला आपण ताबडतोब बिऱ्हाड बदलूं या.

**लक्ष्मीबाई :** एवढ्या रात्रीं ? अन् जागा कुठें मिळणार ?

**हरिहरपंत :** जागा नाहीं तर नाहीं. रस्ता तरी मोकळा आहे ना ?

**लक्ष्मीबाई :** तिथें तो आला तर ?

**हरिहरपंत :** हो. तुझं म्हणणंही रास्त आहे. पण ह्याचा कांहीं तरी बंदोबस्त केल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं. ह्याला आपला इंगा दाखवलाच पाहिजे.

**लक्ष्मीबाई :** पण तें जमणार कसं ?

**हरिहरपंत :** हां हां ! जमलं ! मी त्याच्यावर खुनाच्या धमकीची फिर्याद गुदरतों. तुम्ही दोघी साक्षीदार आहांतच.

**लक्ष्मीबाई :** आम्हीं साक्षीदार आहोंच. पण आम्हीं साक्ष काय द्यायची ?

**हरिहरपंत :** ह्यानें अशी अशी धमकी दिली. आम्ही ती ऐकली. वगैरे वगैरे.

**नलिनी :** बाबा, तुम्हीं त्यांची नाचक्की केलीत, तेव्हांच ना त्यांनीं तुम्हांला धमकी दिली ?

**हरिहरपंत :** वा ! खूपच आहेस तूं ! म्हणजे त्यानें उजळ माथ्यानें चोऱ्या कराव्या; आणि तें उघडपणानें बोलायला मात्र आम्हांला चोरी ?

**नलिनी :** मीं कांहीं त्यांच्याविरुद्ध साक्ष देणार नाहीं.

**हरिहरपंत :** अग कार्टे, तुझी बापावर कांहीं मायाममता आहे का नाहीं ?

**नलिनी :** कसली माया ममता ? तुम्हीं जर त्यांच्यावर कुभांड रचायला लागलांत—

**हरिहरपंत :** कुभांड ? खबरदार एक शब्द बोलशील तर !

**लक्ष्मीबाई** : अहो, तुम्हीं आतांच आपल्या त्या वायचळ वकिलांकडे जा आणि त्यांचा सल्ला घेऊन या. जा बरं !

**हरिहरपंत** : आत्तां, अशा रात्रीं एकटा जाऊं ? अहाहा ! काय पण माझी काळजी ! त्यानें माझ्यावर आतांच हल्ला केला तर ?

**लक्ष्मीबाई** : इश्श ! काय पण ? अहो नलूला बरोबर घेऊन जा.

**हरिहरपंत** : अहाहा ! नलूला बरोबर घेऊन जा ! अक्कल पण अक्कल ! दिवे ओवाळा दिवे ! तो गुंड आला म्हणजे ही त्यालाच मिळायची !

**लक्ष्मीबाई** : अगबाई खरंच कीं !

**हरिहरपंत** : त्यापेक्षां असं कर; तूंच चल माझ्या सोबतीला.

**लक्ष्मीबाई** : माझी तेवढी अक्कल काढलीत ! आणि तुमचा हा शहाणपणा का ? मी तुमच्या सोबतीला येऊन कसं भागेल ? मी गेल्यावर ही त्या गुंडाकडे जाईल ती ?

**हरिहरपंत** : अन्याऱ्या ! ती कशी जाईल ? सगळ्या दरवाज्यांना कुलपं ठोकून, त्यांच्या किल्ल्या आपल्याजवळ घेतल्यावर ही तिकडे जाईल कशी ? जा, आंतल्या दरवाजाला कुलूप आहे कीं नाहीं तें पाहून ये. [ पाहून येते. ] इथें तर कुलूप आहेच ! आतां तें कुलूप नि तो दांडा घे, नि चल माझ्या बरोबर, नलू आम्हीं परत येईपर्यंत इथून हालू नकोस.

**लक्ष्मीबाई** : जर तिकडे गेलीस तर ह्या दांड्याशीं गांठ पडेल तुझी. [ पंत व लक्ष्मीबाई जातात ]

**नलिनी** : इथून हालूं नकोस ! माई, बाबा, कां छळतां तुम्हीं मला ? माझी निवड अयोग्य का आहे ? तेजःपुंज सूर्य नको, काजव्याच्या प्रकाशाची वाट पाहा, असं सांगण्यासारखंच नाहीं का हें ? कशी जाऊं मी त्यांच्याकडे ? ही एकलेपणाची आग नाहीं सहन होत मला. श्री, श्री आतां तूंच मला मार्ग दाखव.

## पद

**माझ्या राजा बोल ना। साहूं रे किती विरह यातना।**
**जाहलें व्याकुळ मी फार। बोल ना सख्या रे।**
**अजुनि कशी न ये, करुणा दयाळा॥**

**मनमोहन तूं मुरलीवाला**
**अधिर बावरी राधाबाला**
**धुंडुनि दमली श्रमली तुजसी**
**विनवित कधिं येसी ॥ १ ॥**

[ पद संपल्यावर विमनस्क स्थितींत खुर्चीवर बसते ]

**श्रीनिवास** : सदोबा सनातने म्हणजे खरोखर कोण गृहस्थ आहे हें नलूनें सुद्धा ओळखलं नाहीं. सांगावं का तिला हें गुप्त रहस्य ? पण नको. बँकेंतून माझी हकालपट्टी होऊन मला जर तुरुंगाची हवा खावी लागणार असेल, तर तूं सनातन्याशीं—माझ्याशीं लग्न कर असं मी तिला कोणत्या तोंडानें सांगूं ! [ मनांत कांहीं विचार आल्यासारखें दाखवून नलिनी खुर्चीवरून उठते व मधल्या दाराचें, कोयंड्यांतून कुलूप काढून श्रीनिवासच्या खोलींत जाते ] कोण तूं ?

**नलिनी** : केवढा घोटाळा केलात तुम्हीं ?

**श्रीनिवास** : काय केलं मी ?

**नलिनी** : बाबांना खुनाची धमकी कां दिलीत ? कां हो असे निष्ठुर झालांत ?

**श्रीनिवास** : हें पाहा नलू, ते तुझे वडील ह्या दृष्टीनें जरी मला त्यांच्या-विषयीं आदर असला, तरी ते जर माझ्या पोटावरच पाय आणणार असतील, तर मी त्यांच्या तंगड्या त्यांच्याच गळ्यांत घातल्याशिवाय राहाणार नाहीं. मग मी तुरुंगांत गेलों तरी बेहेत्तर !

**नलिनी** : मग तुमचं माझं लग्न ?

**श्रीनिवास** : प्रथम मला पोटाचा प्रश्न विचारांत घ्यायला हवा ! तो सुटला कीं मग पुढचा प्रश्न ! त्या सदोबा सनातन्याशीं...

**नलिनी** : नांव नका काढूं त्या मेल्याचं ! पुन्हा आमच्या घरांत तो येऊं दे तर खरा, त्याच्या त्या दाढ्यामिशांच्या जंगलाला आग लावीन.

**श्रीनिवास** : सदोबा सनातने, हाय हाय !

**नलिनी** : आतां पुढं काय करायचं ?

**श्रीनिवास** : पुढं काय करायचं तें पाहायला तुझे वडील माईला घेऊन गेले आहेत ना बाहेर ?

**नलिनी :** तुम्हीं दिलेल्या खुनाच्या धमकीबद्दल सल्ला विचारण्यासाठीं, ते वायचळ वकिलांकडे गेले आहेत.

**श्रीनिवास :** मला वाटलं मुहूर्त पाहायला भटजींकडे गेले !

**नलिनी :** मी अगदीं भांबावून गेलें आहें. मला कदाचित तुमच्याविरुद्ध साक्ष देण्याची ते सक्ति करतील; अन् गडबडगुण्डा करून माझं त्या सनातन्याशीं लग्न उरकून टाकण्याचीही खटपट करतील. काय करूं हो मी आतां ? बाबा, कां एवढे निष्ठुर झालांत तुमच्या ह्या मातृहीन मुलीवर ? माझ्या मर्जीविरुद्ध, माझ्या गळ्यांत दावं बांधून, कुणाच्यातरी गोठ्यांत मला डांबून टाकायची होती, तर मला एवढी वाढवली कशासाठीं ? कशाला दिलंत मला इतकं शिक्षण ? त्यापेक्षां जन्मल्याबरोबर मला विष पाजलं असतंत तर ?—माझं एक काम कराल का ?

**श्रीनिवास :** कोणतं काम ?

**नलिनी :** मला असं जहरी विष आणून द्या कीं त्याचा एक थेंब माझ्या पोटांत जातांच मी दगड होऊन जमिनीवर कोसळेन. कराल का एवढं काम ? फार उपकार होतील तुमचे माझ्यावर.

**श्रीनिवास :** नलू नलू, अशी हताश होऊं नकोस. पूस पूस ते अश्रु ! तूं घाबरूं नको. वाटेल ती युक्ति लढवून मी तुला ह्या प्रसंगांतून सोडवीन.

**नलिनी :** नुसतं सोडवून काय उपयोग ?

**श्रीनिवास :** नंतर तुझ्याशीं लग्न करीन.

**नलिनी :** खरं ? अगदीं खरं ?

**श्रीनिवास :** खरं खरं खरं !

**नलिनी :** आतां मी इथून जाणारच नाहीं.

**श्रीनिवास :** असं नको करूं. तूं आपल्या खोलींत चालायला लाग कशी. नाहींतर माझ्या कारस्थानांत व्यत्यय यायचा.

**नलिनी :** व्यत्यय आलाच तर हा पाहा त्याच्यावरचा तोडगा.

[ नलिनी ग्लासांत पाणी ओतते व त्यांत फाउंटन पेन मधील शाई घालते ]

**श्रीनिवास :** हें काय केलंस ?

**नलिनी :** तुम्हांला नाहीं समजायचं तें !

[ पंत व लक्ष्मीबाई प्रवेश करतात. ]

**हरिहरपंत** : वकिलांचं म्हणणं मला पटलं. हा रोज असलं कांहींतरी बोलणारच !

**लक्ष्मीबाई** : उद्यां येतील ना ते आडून ऐकायला ? अगबाई, पोरगी कुठें गेली ?

**हरिहरपंत** : आतां, सगळ्या दारांना कुलपं असतांना कशी गेली ?

**लक्ष्मीबाई** : [ कोयंडा पाहून ] कडींतून कुलूप काढून गेली.

**हरिहरपंत** : [ हातवारे करून ) फोडून टाक तें कुलूप. तोडून टाक तो कोयंडा !

**लक्ष्मीबाई** : म्हणजे त्याला इथें यायला आयतं मुक्तद्वार !

**हरिहरपंत** : काय करूं रे ! त्याचा जीव घेऊं का ? [ श्रीनिवासकडे जाऊं लागतात ]

**लक्ष्मीबाई** : नका, नका तुम्हीं नका त्याच्या खोलींत जाऊं.

**हरिहरपंत** : मग काय पोरीला डोळयांदेखत, वाघाच्या जबड्यांत ढकलूं ?

**श्रीनिवास** : पंत आले.

**नलिनी** : अग आई ग !

**हरिहरपंत** : तो खुनी सैतान आहे. जंटल्मन डाकू आहे.

**श्रीनिवास** : सैतान डाकू !

**लक्ष्मीबाई** : अन् ती पोरगी सुद्धा अशी कांहीं डाकूकी लडकी आहे !

**हरिहरपंत** : मी त्याचा सूड उगवणार [ जाऊं लागतात. लक्ष्मीबाई त्यांना अडवते]

**श्रीनिवास** : माझा सूड उगवणार ? थांब, मीच तुला यमाच्या घरची वाट दाखवतों. [ पंतांकडे जाऊं लागतो. नलिनी त्याला आवर घालते ]

**हरिहरपंत** : अग सोड, सोड मला.

**श्रीनिवास** : नलू, जाऊं दे ग मला ! तो थेरडा तुझा बाप आहे म्हणूनच मी इतका वेळ त्याला गय केली. ह्यापुढें तें शक्य नाहीं. जाऊं दे ग मला.

**हरिहरपंत** : ऐक ग ऐक. ती बघ, पोरगी त्याच्याकडेच आहे ग. सोड जातों मी. [ पंत व श्रीनिवास मधल्या दरवाजाकडे येण्याचा प्रयत्न करतात. लक्ष्मीबाई व नलिनी त्यांना मागें ओढतात. शेवटीं नलिनी श्रीनिवासला सोडते व टेबल-

जवळील खुर्चीवर बसते. श्रीनिवास मधलें दार उघडतो. पंत व तो उसनें हास्य करतात ] कुठें आहे माझी मुलगी ?

**श्रीनिवास** : [ दाखवून ] ती दिसत नाहीं का ?

**हरिहरपंत** : [ श्रीनिवासाकडे जाऊन ] कार्टे, चल घरीं ! [ लक्ष्मीबाई श्रीनिवासच्या खोलींत जाते ]

**नलिनी** : आतां त्या घरीं नाहीं. मी देवाच्या घरीं चालती होणार. हें विष मला तिथें पोचवील. तिथून तरी तुम्हीं मला आणूं शकणार नाहीं ना ?

**हरिहरपंत** : विष ? कुठें आहे विष ?

**नलिनी** : [ ग्लास दाखवून ] हें पाहा. हें पाहा.

**लक्ष्मीबाई** : पाहूं , पाहूं तुझं वीष ?

**नलिनी** : पाहा. छाती असेल तर थोडं चाखून पाहा.

**हरिहरपंत** : तें खरंच विष असेल का ग ?

**लक्ष्मीबाई** : मला जरा संशयच येतो आहे. काय तें शाईसारखं दिसतं आहे.

**नलिनी** : माई तुमचा विश्वास नसेल तर खात्री करून घ्या !

**श्रीनिवास** : गुण न आल्यास पैसे परत.

**हरिहरपंत** : अग बघ ना !

**लक्ष्मीबाई** : तर तर ? तुमचं काय जातं ? मी मेलें तर तुम्हीं तिसरं लग्न कराल. मी मात्र फुकट प्राणाला मुकेन. मी नाहीं ग बाई विषाची परीक्षा पाहाणार ! माझी खात्री आहे कीं तें विषच असलं पाहिजे. तुमचा विश्वास नसेल तर तुम्ही प्या !

**हरिहरपंत** : हं; समजलों. माझा कांटा काढण्याकरतां ह्या जहांबाजानें ही जालीम युक्ति काढलेली दिसते. मी इथें यावं; ह्यानें शाईसारखं दिसणारं पण खरोखरीचं विष ठेवावं नि तें खोटं आहे असं आम्हांला भासवावं. आम्हीं सरळपणानें, खात्री करण्यासाठीं एक घोट घ्यावा आणि आमची गठडी वळावी. हें नक्की विषच असलं पाहिजे.

**श्रीनिवास** : तें विष तुमची एकुलती एक मुलगी प्यायला लागली होती. परंतु माझ्या खोलींत ती विष पिऊन मेल्यास माझ्यावर तोहमत येईल, म्हणून

मीं विल्ज महत्प्रयासानें थोपवून धरली ह्या वेळ पावेतों. आतां हें विष आणि ही कन्या आपल्या ताब्यांत घ्या.

**हरिहरपंत :** आम्हांला विषाची जरूरी नाहीं. तुम्हीच जपून ठेवा तें. तुरुंगांत जातांना तुम्हांलाच उपयोगी पडेल तें कदाचित.

**श्रीनिवास :** ठीक आहे. मला त्याची जरूरी पडणंच शक्य नाहीं. म्हणून हें विष फेकून देतों; [ फेकतो ] आणि ही जिवंत मुलगी तुमच्या स्वाधीन करतों. नलू, घरांत जा आपल्या.

[ नलिनी, लक्ष्मीबाई व पंत आपल्या ब्लॉकमध्यें येतात.
पंत व श्रीनिवास एकमेकांकडे रोखून पाहातात ]

**हरिहरपंत :** मिस्टर, ह्यापुढें जर माझी मुलगी तुमच्या खोलींत दिसली, तर मग—मला—

**श्रीनिवास :** काय कराल हो तुम्हीं ? तुमची मुलगी माझ्या खोलींत येते. मी तुमच्या खोलींत पाऊलही टाकीत नाहीं. समजलांत ?

**हरिहरपंत :** बरं आहे; बरं आहे बच्चंजी पाहून घेईन. [ दार लावून घेतो ]

**श्रीनिवास :** तुझ्याच मुलीशीं लग्न लावीन, तरच नांवाचा श्रीनिवास.

**हरिहरपंत :** उद्यां तुला तुरुंगांत पाठवीन, तरच नांवाचा हरिहरपंत !

**श्रीनिवास :** तुझ्यासारख्या चिल्टाला चिरडायला कितीसा वेळ लागणार !

**हरिहरपंत :** तुझ्यासारख्या चुंगुरट्याचा खातमा करायला, कितीसे सायास पडणार !

**श्रीनिवास :**
**हरिहरपंत :** } पाहा पाहा आतां ! बेट्या पाहा !

पडदा पडतो.

# ३

[ दृश्य पहिल्या अंकांतलेंच. श्रीनिवास वाचीत बसला आहे. पंत बाहेर गेले असून, लक्ष्मीबाई हातांत एक फुलपात्र घेऊन व नलिनी बादली कळशी घेऊन पाणी आणायला जायच्या तयारींत आहेत असा पडदा उघडतो. ]

**लक्ष्मीबाई** : आतां फक्त दोन खेपा पाणी आणलं म्हणजे झालं हो.

**नलिनी** : आणलं ! म्हणजे मीच आणायचं ना ? मी दोनच कां, दहा खेपा सुद्धां आणीन. माझ्याबरोबर हात हालवीत येऊन तुम्ही जर दमलां असाल, तर विश्रांति घ्या.

**लक्ष्मीबाई** : मी काय करावं, हें तूं नको मला शिकवायला ! माझ्यापुरती अक्कल देवानें दिली आहे मला ! उचल ती बादली नि कळशी आणि चल.

[ जातात. श्रीनिवास उठतो. गॅलरींत पाहून परत येतो. ]

**श्रीनिवास** : अरेच्या ? अद्याप पाणी परेडच चालली आहे का ह्यांची ? मघां-पासून नलिनी एकटी भेटावी म्हणून सारखा प्रयत्न करतों आहें. परंतु ही महा-माया माई छायेसारखी तिच्याबरोबर घोटाळते आहे. माझ्या उत्फुल्ल झालेल्या

भावना, मी तिच्याशिवाय दुसऱ्या कुणाला सांगू? माझं हृदय, मी तिच्या-शिवाय दुसऱ्या कुणाजवळ उघडं करूं?

## पद

**फुलल्या भावना माझ्या, मनींच्या, सांगुं कुणाला, सांग ना ॥**
**तूंच माझा भाग्यतारा**
**दे उजाळा ह्या संसारा**
**तुझ्याविना फोलपसारा**
**पाहूं नको अंत आतां ॥ १ ॥**

**हरिहरपंत** : [ हनुमंताची तसबीर कागदांत गुंडाळून घेऊन प्रवेश करून ] नलू, ए नलू! भीमरूपी महारुद्र, वज्र हनुमान मारती; वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना.

[ नलिनी बादली व कळशी घेऊन व लक्ष्मीबाई एक फुलपात्र घेऊन प्रवेश करून नलिनी आंतल्या खोलींत जाते व लक्ष्मीबाई दमल्याचा आविर्भाव करून खुर्चीवर बसते. ]

**लक्ष्मीबाई** : नलू, हें फुलपात्र आंत नेऊन ठेव [ नलिनी फुलपात्र आंत नेते ]

**हरिहरपंत** : आज आम्हीं काय आणलं आहे तें पाहिलंत का ?

**लक्ष्मीबाई** : मला पातळबितळ आणलं वाटतं ?

**हरहरपंत** : तुला पातळाशिवाय दुसरं दिसतं आहे काय ? माझा सगळा पगार तुझ्या लुगड्या-पातळांत खर्च करून महिनाभर वारा खात बसायचं कीं काय ? [ तसबीर दाखवून ] हें पाहा मीं काय आणलं आहे तें.

**लक्ष्मीबाई** : इश्श ! चांगला शंकर-पार्वतीचा फोटो आणायचा सोडून, हा ब्रह्मचारी बजरंग कशाला आमच्या घरांत ?

**हरिहरपंत** : सत्राणें उड्डाणें; अग मला ताकद येण्यासाठीं मी आतां मारुति-भक्त होणार. त्या गुंडाशीं दोन हात करायची ताकद आली पाहिजे मला. ह्यापुढें दर शनिवारीं मारुतीचा उत्सव करणार आपण. आणि अनायासें आज शनिवार असल्यामुळें, आजपासूनच सुरुवात करूं म्हटलं. आज फक्त मारुतीची स्थापना करायची !

**नलिनी** : [ प्रवेश करून ] माई; सगळ्या तपेल्या आणि पातेल्या भरून झाल्या. आतां पळ्या नि चमचे तेवढे भरायचे राहिले आहेत. ते भरूं का ? अर्धी बादली पाणी शिल्लक आहे अजून.

**लक्ष्मीबाई** : पाहिलीत, पाहिलीत कशी माझी टिंगल करते ती ! पाणी आणायला सांगितलं, म्हणून हो हें ! तरी मी सहसा तिला नाहीं सांगत हो इकडची काडी तिकडे करायला. मीच उपसतें कामाचे डोंगर.

**हरिहरपंत** : त्याबद्दल खात्री आहे माझी.

**लक्ष्मीबाई** : नलू, अर्धी बादली पाणी शिल्लक आहेना ? तें ओतून टाक मोरींत आणि नळावरून पुरी बादली भरून आण.

[ नलिनी आंत जाते. ]

**हरिहरपंत** : आयतं पाणी आणलेलं आहे तें ओतून कां टाकायचं ?

**लक्ष्मीबाई** : तुम्हांला नाहीं हो कळायचं तें ! मोरी साफ होते. [ नलिनी प्रवेश करते ] चल. [ नलिनीबरोबर जाऊं लागते ]

**हरिहरपंत** : तूं थांब इथें. तसबीर टांगू या आपण.

**लक्ष्मीबाई** : आणि हिला एकटीला नळावर पाठवूं ?

**हरिहरपंत** : जरा पाणी आणायला गेली म्हणून काय झालं ? मी घरांत आहे ह्याची जाणीव आहे तिला. जा तूं नलू. पाणी घेऊन ये. [ पंत व लक्ष्मीबाई तसबीर टांगू लागतात. नलिनी थोडा वेळ थांबून श्रीनिवासच्या खोलीत जाते ]

**नलिनी** : [ खुणेनें ] अजून इथं आहांत का ?

**श्रीनिवास** : मग मी जाणार कुठें ?

**नलिनी** : [ खुणेनं ] बोलू नका. माई नि बाबा तिकडे आहेत. अजून बेड्या नाहीं का पडल्या हातांत ?

**श्रीनिवास** : काय ?

**नलिनी** : [ खुणेनें ] बेड्या.

**श्रीनिवास** : बांगड्या ?

**नलिनी** : [ हळूच ] नव्हे हो. बेड्या बेड्या.

**श्रीनिवास** : असं असं !

**हरिहरपंत** : [ खुर्चीवर चढत तसबीर टांगतांना ] सत्राणें उड्डाणें हुंकार वदनीं, करि डळमळ भूमंडळ [ इतक्यांत खुर्चीवरून तोल जाऊन तसबिरीसकट जमिनीवर येतात. हा आवाज ऐकून नलिनी घाबरते व झटक्यानें बादली न घेतां आपल्या ब्लॉकच्या खिडकींत येते. तिच्या मागोमाग बादली घेऊन श्रीनिवासही येतो. तीं दोघं हळूच डोकावून पाहातात व पुन्हा श्रीनिवासच्या ब्लॉकमध्यें जातात.)

**लक्ष्मीबाई** : लागलं का कुठं ?

**हरिहरपंत** : [ एकदम ताठ उभे राहून चालूं लागतात. ] छे छे ! मुळींच नाहीं.

**लक्ष्मीबाई** : लाजायचं कशाला ? खरं सांगायला मुळींच हरकत नाहीं. तुम्हांला पडलेले कुणींही पाहिलं नाहीं.

**हरिहरपंत** : कुणीं पाहिलं नाहीं ना ? बरं झालं. माझं अर्धं दुःख कमी झालं.

**लक्ष्मीबाई** : म्हणजे मार बसला का कुठं ?

**हरिहरपंत** : हो इथं, इथं हनुमंतानं थोडासा प्रसाद दिला. आतां तूंच टांग ती तसबीर. [ लक्ष्मीबाई तसबीर टांगते. पंत खुर्ची धरतात ]

**नलिनी** : तुरुंगात जायची भीति नाहीं ना ?

**श्रीनिवास** : अग ज्याला कर नाहीं त्याला डर कशाची ?

**हरिहरपंत** : [ तसबीर टांगून झाल्यावर ] नलू, ए नलू ?

**लक्ष्मीबाई** : पाणी आणायला एकटी पाठवलीत ना ? घ्या आतां पाणी. अजून एक बादलीभर पाणी भरून झालं नाहीं का ? थांबा मी नळावरून पाहून येतें. [ लक्ष्मीबाई जायला निघते. एवढ्यांत नलिनी रिकामी बादली घेऊन प्रवेश करते तिला पाहून ] आलांत ? पाणी कुठं आहे ?

**नलिनी** : माई, मला कुणी भरायलाच देत नाहीं पाणी. सगळयाजणी माझ्यापूर्वी लावतात बादल्या. आणि तुम्हीं बरोबर असलांत, म्हणजे आगीचा बंब येतांना पाहिल्याबरोबर जशीं माणसं पळतात, तशा आपोआप दूर जातात.

**लक्ष्मीबाई** : वेंधळीच आहेस तूं ! चल मी येतें तुझ्याबरोबर.

**हरिहरपंत** : बादली आंत नेवून ठेव ती. पुरे झालं पाणी. आतां इकडे काय काय वक्तव्यं होतात तीं ऐकायला बस.

[ नलिनी बादली आंत नेऊन ठेवते व पुन्हा बाहेर येते ]

**लक्ष्मीबाई** : खरंच, अजून कसे नाहीं आले वकीलसाहेब ?

**हरिहरपंत** : मी त्यांचीच वाट पाहात आहें. आज तो गुंड खात्रीनें कांहीं-तरी बोलेल. तें वकिलानीं ऐकलं, म्हणजे ते आयतेच साक्षीदार होतील, असा आहे माझा डाव.

**लक्ष्मीबाई** : ह्या नलूच्या देखत ह्यांतलं कांहीं बोलतां नये. ती सगळं त्याला सांगेल.

**हरिहरपंत** : किती दिवस सांगेल ? आजचाच दिवस ना ? उद्यां तिचं सनातन्यांशीं लग्न लावून टाकतों. उद्यां मुहूर्त आहेच लग्नाचा !

**लक्ष्मीबाई** : आणि आज सुद्धा आहे ना रात्रीं दहा वाजतां ?

**हरिहरपंत** : आज आहे ग. पण आतांच नऊ वाजून गेले. एवढ्या थोड्या वेळांत इतकी कशी तयारी होणार ? बाकी मी स्वतः चटावर लग्नं उरकण्याच्या मताचा आहें. पण तो आहे सनातनी.

**लक्ष्मीबाई** : शिवाय त्याची पसंती नापसंती कुठें कळली आहे अजून ? आज गेलां होतां का त्याच्याकडे ?

**हरिहरपंत** : गेलों होतों. पण तो गेला होता छातीवर दगड फोडण्याची शर्यत होती त्या शर्यतींत भाग घ्यायला. आतां उद्यां सकाळींच त्याला गांठतों, नि उद्यां सायंकाळींच गोरज मुहूर्तावर, नलू–सनातन्यांचं शुभमंगल करून टाकतों. मग शेंडी तुटो नाहीं तर पारंबी फुटो. अरे ? तो वायचळ वकील कुठें वायचळला ? मी त्याला घेऊन येतों बरं का ! तोंपर्यंत हिच्यावर सक्त पहारा ठेव. मी गेल्यावर इथून हालूं नकोस. नाहींतर, त्या शांतारामाच्या चाळींतल्या शांताबाईकडे जाशील.

**लक्ष्मीबाई** : त्यांच्याकडे कशाला जायचं ?

**हरिहरपंत** : आज आतां त्यांच्या चाळींत गारुड्यांचा खेळ आहे, म्हणून बजावून ठेवतां. हो, तूं खेळ पाहायला जायचीस आणि तो रावण ह्या सीतेला खांद्यावर घालून घेऊन जायचा.

**लक्ष्मीबाई** : घेऊन जातो आहे ! तो रावण असला तर मी अहिरावण आहें.

**हरिहरपंत** : तूं अहिरावण ऐस किंवा महिरावण ऐस. मी आपली तुला सूचना देऊन ठेवतों. [ जाऊं लागतात ] अरे ? माझी छत्री काय झाली ?

**लक्ष्मीबाई** : नलूनें ती आज एका भिकाऱ्याला दिली हो.

**हरिहरपंत** : काय ? एवढी कोरी करकरीत छत्री तिनें भिकाऱ्याला दिली ?

**नलिनी** : कोरी कसली ? सतरा छिद्रें होतीं तिला पडलेलीं.

**हरिहरपंत** : छिद्रंवाल्या छत्रीचा उपयोग तुम्हांला काय कळणार आहे ? नलू, तुझ्या बापाची संपत्ति कांहीं वर आलेली नाहीं. काय कार्टी आहे तरी ! [ जातो ]

**लक्ष्मीबाई** : नलू तूं आंत जाऊन झोप बरं.

**नलिनी** : मला नाहीं झोप येत.

**लक्ष्मीबाई** : कां ? झोप न यायला काय झालं ?

**नलिनी** : तुमच्या खेडेगांवांतल्या मुली...

**लक्ष्मीबाई** : रात्रभर झोपूनच असतात. मग तुझा असा निद्रानाश कां झाला ?

**नलिनी** : माई, तुम्हीं खेडेगांवांतल्या. तुम्हांला हो कशी झोप येत नाहीं अजून ?

**लक्ष्मीबाई** : अग माझं लग्न झालं आहे.

**नलिनी** : आणि माझं होणार आहे.

**लक्ष्मीबाई** : कुणाशीं ?

**नलिनी** : त्या सनातन्याशीं.

**लक्ष्मीबाई** : ते तुला पसंत आहेत ?

**नलिनी** : असा वर सात जन्म तपश्चर्या केली तरी मिळायचा नाहीं. आतां बाबा आले म्हणजे मींच त्यांना सांगेन कीं माझं उद्यां सकाळींच त्या सनातन्यांशीं लग्न लावून द्या.

**लक्ष्मीबाई** : अहाहा ! किती गुणाची आहे बाळ माझी ? दृष्ट सुद्धा लागेल कुणाची. मीटमोहऱ्या तरी ओवाळून टाकतें तुझ्यावरून [ आंत जाते ]

**नलिनी** : [ मधल्या दाराजवळ जाऊन ] श्रीनिवास, बाबा बाहेर गेले आहेत. माईना कसंही करून शांताबाईकडे पाठवा गारुड्याचा खेळ पाहायला. तुम्हांला कांहीं सांगायचं आहे. [ खुर्चीवर बसते ]

**लक्ष्मीबाई** : [ प्रवेश करून ] कुणा बुवासुवाची, गुंडासुंडाची, स्वरूपावर

शिक्षणावर किंवा कसल्यावरही दृष्ट पडली असेल तर ती साफ जळून ग्वाक होवो आणि माझी बाळ गुणाची होवो. [ मोहऱ्या ओवाळते व आंत जाते ]

**श्रीनिवास :** [ पंतांच्या ब्लॉकच्या खिडकींत येऊन, बायकी आवाजांत ] लक्ष्मुमबाई आहेत का ?

**नलिनी :** कोण तूं ?

**श्रीनिवास :** मी ती, ताराबाई. लक्ष्मुमबाईंना म्हणावं, शांताबाई गारुड्याचा खेळ पाहात असतांना तिसऱ्या मजल्यावरून घेरी येऊन पडल्या. त्यांच्या यजमानांनीं, लक्ष्मुमबाईंना ताबडतोब बोलावलं आहे [ जातो ]

**नलिनी :** [ मोठ्यानं ] बरं बरं सांगतें हो.

**लक्ष्मीबाई :** [ प्रवेश करून ] काय ग ?

**नलिनी :** माई, शांताबाई गारुड्यांचा खेळ पाहात असतांना घेरी येऊन पडल्या. त्यांचं डोकं फुटून रक्तबंबाळ झालं आहे आणि आतां मरतात का आणखी एका क्षणानं मरतात अशा स्थितींत आहेत. तुम्हांला त्यांच्या यजमानांनीं ताबडतोब तिथं बोलावलं आहे.

**लक्ष्मीबाई :** कुणीं सांगितलं तुला हें ?

**नलिनी :** आतांच इथें एक बाई येऊन गेली. तिनं सांगितलं.

**लक्ष्मीबाई :** पण तुला एकटीला इथं ठेवून कशी जाऊं ? ते तर बजावून गेले आहेत, ‘ कुठेंही जाऊं नको म्हणून ? ’

**नलिनी :** नका जाऊं. माझं काय जातं ? तुमची मैत्रीण ती. तिची मृत्युभेट हवी असेल तर जा. उद्यां तुम्हांला नाहीं भेटूं शकणार ती.

**लक्ष्मीबाई :** नको ग असं बोलूं. सत्तायुषी होवो बिचारी. [ श्रीनिवास शिंकतो ] कसा मेला वैरी शिंकला !

**नलिनी :** असल्या लोकांची शिंक खरी होते म्हणतात. उद्यांचा दिवस कांहीं त्या पाहात नाहींत.

**लक्ष्मीबाई :** नकू, मी जातेंच ! तूं ही चल माझ्याबरोबर.

**नलिनी :** आणि तेवढ्यांत बाबा आले तर ?

**लक्ष्मीबाई :** असं करतें, मी सगळीकडे कुलपं लावतें. मी येण्यापूर्वी जर ते आले तर...

**नलिनी :** ते आंत कसे येणार? म्हणून किल्ल्या माझ्याजवळ ठेवून जा म्हणजे झालं.

**लक्ष्मीबाई :** वा ग शहाणे! चोराच्या हातांत जामदारखान्याच्या किल्ल्या देण्या-इतकी मी दुधखुळी नाहीं. मी इथें नसतांना जर ते आले तर मी नळावर गेलें आहें असं सांग त्यांना. आंत कुलूप आहेच. इथें हें कुलूप लावतें. [ मधल्या दरवाजाला मोठं कुलूप लावते ] वेळ आली बिचारीची. देवाघरचं बोलावणं कुणाला केव्हां येईल त्याचा कांहीं नेम नाहीं. मला त्या जिवंत भेटतील तरी का? शांताबाई ऽ [ रडते ] आलें हो आलें [ जाते ]

**नलिनी :** या हो या! श्रीनिवास, माई गेल्या!

**श्रीनिवास :** हो. ये ना!

**नलिनी :** कशी येऊं? माईंनीं इकडून मोठं कुलूप लावलं आहे.

**श्रीनिवास :** मोठं कुलूप लावलं का? आतां तुला तिकडे आणि मला इकडे, निःश्वास सोडीत बसावं लागणार असं दिसतं.

## पद

**श्रीनिवास :** **शेजारच्या बिऱ्हाडीं आहेस एकली तूं**
**येऊं तिथें कसा मी न कळे मला परंतू ॥ १ ॥**
**नलिनी :** **दुर्दैव तुझें माझें कुणि नाहीं पाठिराखा**
**श्रीनिवास :** **देऊनि धीर आम्हां दावील मार्ग खासा॥२॥ शेजारच्या**
**नलिनी :** **आशारवी बुडाला असहाय होइ जीव**
**श्रीनिवास :** **अन् शुक्र तारकेचा नाहीं अजूनि ठाव ॥३॥ शेजारच्या**
**नलिनी :** **गुंफूनि अश्रुमाला तूं मजसि वाहशील**
**श्रीनिवास :** **परि तप्तश्वास माझे तिज लागतां सुकेल ॥ ४ ॥**
**नलिनी :** **शेजारच्या बिऱ्हाडीं आहेस एकला तूं**
**येऊं तिथें कशी मी न कळे मला परंतू ॥**
**चंद्रास ग्रासण्याला, का टपति राहु केतू**

**श्रीनिवास : घेतील घास सखिचा, कां मी इथूनि पाहूं ? ॥ ५ ॥**
**विश्वास धरी सखये धावेल वैनतेय**
**हिसकाउनी सुधेला होईल चिरंजीव ॥ ६ ॥**

[ दोघेंही हताश होऊन आपापल्या खोलींत बसतात. कांहीं वेळानं श्रीनिवास आठवण झाल्यासारखें करतो व उठून आपल्या टेबला-जवळ जातो आणि तिथला किल्लयांचा जुडगा उचलून पंतांच्या खिडकीजवळ येतो ]

**श्रीनिवास** : ह्या किल्लयांतली एखादी किल्ली लागते का पाहा बरं. [ खिडकीच्या गजांतून किल्लयांचा जुडगा देतो. त्यांतल्या एका किल्लीनें नलिनी मधल्या दाराचें कुलूप काढते व श्रीनिवासच्या खोलींत जाते )

**नलिनी** : आज तोंड सांभाळूनच बोला बरं का ! आज ते वायचळ वकील आमच्याकडे येऊन बसणार आहेत.

**श्रीनिवास** : कोण ? वायचळ का, वायचळ ?

**नलिनी** : हो. आणि तुम्हीं काय बोलतां, तें आडून ऐकून स्वतःच साक्षीदार होणार आहेत ते !

**श्रीनिवास** : अरेच्या ! असा डाव रचला आहे का त्यांनीं ?

**नलिनी** : तसंच, बाबा उद्यांच माझं त्या सनातन्याशीं लग्न लावणार आहेत.

**श्रीनिवास** : लग्नाची तयारी केव्हां करणार ?

**नलिनी** : हें चटावरचं लग्न आहे. तेव्हां तुम्हांला जी खटपट करायची असेल ती आतांच करा.

**श्रीनिवास** : नलू, मी जर तुझ्या वडिलांना कांहीं बोललों तर तूं रागावणार नाहींस ना ?

**नलिनी** : तुम्हीं वाईटसाईट बोलतां नये !

**श्रीनिवास** : ठीक. तूं आतां असं कर, आपल्या खोलींत जा आणि माझ्या नांवानें एक फक्कडसं प्रेमपत्र लिही नि तें माझ्या स्वाधीन कर. म्हणजे पुढें काय करायचं तें मी पाहातों.

**नलिनी** : प्रेमपत्र ! अरे बापरे ! नाहीं. अग बाईग !

**श्रीनिवास** : कां ? प्रेमपत्र लिहिणं कांहीं कठीण नाहीं.

**नलिनी** : पत्राला आरंभ कसा करायचा तो सुद्धा मला माहीत नाहीं.

**श्रीनिवास** : प्रथम लिही–प्रिय श्रिनिवास, सख्या हरि. माझं तुमच्यावर अलोट प्रेम आहे. वगैरे वगैरे वगैरे. पुढें काय लिहायचं तें तुला माहीत असेलच.

**नलिनी** : छे हो ! ह्या प्रांतांतली मला मुळींच माहिती नाहीं. आजचं हें माझं पहिलंच प्रेमपत्र आहे.

**श्रीनिवास** : नक्कू, तूं विसाव्या शतकांत आहेस. आजकालच्या प्रत्येक तरुणीनें आपल्या सत्य किंवा काल्पनिक प्रियकराला एखाद दुसरं तरी प्रेमपत्र लिहिलेलें असतं. अन् तूं ही अशी कशी ?

**नलिनी** : बरं, पत्राचा शेवट तरी कसा करूं ?

**श्रीनिवास** : शेवट ? शेवटीं लिही, ' ह्या नरराक्षसांच्या जाचांतून आपण मला लवकरच सोडवाल, या आशेवर जिवंत असलेली आणि कायावाचामनानं आपली झालेली सौ. नलिनी. '

**नलिनी** : इश्श, असं लिहायचं ?

**श्रीनिवास** : लाडके...

**नलिनी** : श्री...

**श्रीनिवास** : माझ्याशीं तुला लग्न करायचं आहे ना ?

**नलिनी** : हो.

**श्रीनिवास** : मग असं तुला लिहिलंच पाहिजे.

**नलिनी** : एवढं लिहिलं म्हणजे आपली ताटातूट नाहीं ना होणार ?

**श्रीनिवास** : नाहीं होणार ! मग आपण जन्माचे साथीदार झालोंच समज.

**नलिनी** : खरंच ? शपथ ?

**श्रीनिवास** : खरंच. तुझ्या गळ्याशपथ.

**नलिनी** : आतां माझ्या मनांतली हुरहुर नाहींशी झाली. मी विजयी झालें. अतिशय आनंद झाला मला—

## पद

**मनींची हुरहुर माझ्या, पार निमाली, चिंता नुरली**
**घेउं नको शपथ, गळ्याची ॥**
**गाठ गुंफिली तुझी नि माझी**
**परमेशानें जन्माआधीं**
**उकलुं शके का कुणी आणि अतां ती**
**झाली निरगांठ । सखया, घेउं नको शपथ.**

[ पद संपल्यावर लक्ष्मीबाई तावातावानें प्रवेश करून ]

**लक्ष्मीबाई** : कोणत्या सटवीनें खोटं सांगितलं, जीभ झडेल मेलीची !

[ नलिनीला शोधूं लागते ]

**नलिनी** : [ हळूच ] माई आल्या.

**श्रीनिवास** : [ हळूच ] बोलूं नको.

**नलिनी** : [ हळूच ] आतां काय करूं ?

**श्रीनिवास** : [ हळूच ] मी काय सांगूं ?

**नलिनी** : [ हळूच ] माई आतां इथें येतील.

**श्रीनिवास** : [ हळूच ] येऊं दे.

**नलिनी** : [ हळूच ] मला मारतील तीं दोघं !

**श्रीनिवास** : [ हळूच ] फार चांगलं होईल.

**नलिनी** : [ हळूच ] असं हो काय ?

**श्रीनिवास** : [ हळूच ] मग मी काय करूं ?

**नलिनी** : [ हळूच ] मला तिकडे पोचवा.

**श्रीनिवास** : [ हळूच ] नकोरे बाबा. मी आपला झोपतों. [ झोपतो ]

**नलिनी** : [ हळूच ] तर मग मी सुद्धां इथेंच पत्र लिहितें. [ पत्र लिहूं लागते ]

**लक्ष्मीबाई** : गेली कुठें ही ? ते आल्यावर काय सांगूं त्यांना ! [ पंत प्रवेश करतात ] कुठं आहेत वकील साहेब ?

**हरिहरपंत** : ते कसले येतात? त्यांच्याच घरीं एक भानगड उपस्थित झाली.

**लक्ष्मीबाई** : काय झालं ?

**हरिहरपंत** : काय व्हायचं ! वकीलसाहेबांची तरणीताठी पोर. त्यांच्या डोळ्यांदेखत शेजाऱ्याचा हात धरून गेली !

**लक्ष्मीबाई** : अग्गोबाई ! काय तरी बाई पोरी ह्या !

**हरिहरपंत** : हल्लींच्या मुलींपुढें बोलण्याची कांहीं सोय राहिली नाहीं.

**लक्ष्मीबाई** : पण ते एवढे कायदेबाज वकील ! खुन्याला सुद्धा फांसावरून खालीं ओढून दोषमुक्त करणारे. त्यांनीं तिला कसं जाऊं दिलं ? एवढं कसं कळलं नाहीं त्यांना ?

**हरिहरपंत** : तेवढं त्यांना कळत होतं म्हणूनच त्यांनीं तिला जाऊं दिलं !

**लक्ष्मीबाई** : म्हणजे त्यांना कळलं पण वळलं नाहीं असंच ना ?

**हरिहरपंत** : अग ती पोरगी होती सज्ञान, वयांत आलेली. वकीलसाहेबांनीं जाणलं कीं इथें कायद्याचा मुळींच उपयोग होणार नाहीं. तेव्हां त्यानीं त्यांची दमछाटी करण्याचा प्रयत्न केला; तों उलट पोरीनेंच त्यांना इंगा दाखवला. शेवटीं वकील साहेबांनीं मूग गिळले नि वधूवरांना तोंडभर आशीर्वाद दिला.

**लक्ष्मीबाई** : बरं, जांवई तरी चांगला आहे का ?

**हरिहरपंत** : कसला चांगला ? बदसूर जोडपं आहे तं. ही चांगली ग्रॅज्युएट हेडमास्तरीण, तर तो मॅट्रिक फेल मोटरड्रायव्हर. पण संमति न देऊन काय करतात बिचारे ? अग आमची नलू कुठें आहे ?

**लक्ष्मीबाई** : अहो नलू सुद्धा तुम्हीं म्हणतां तशी सज्ञान नि वयांत आलेली आहे ना ?

**हरिहरपंत** : मोठ्यानें बोंबलूं नको. तो ऐकेल. नलू आहे कुठें ?

**लक्ष्मीबाई** : मी आलें तेव्हां ती खोलींत नव्हती.

**हरिहरपंत** : तूं कुठें तडफडली होतीस तेवढ्यांत ? शांताबाईकडे गेली असशील !

**लक्ष्मीबाई** : नाहीं हो—मी—मी नळावर गेलें होतें कामाला.

**हरिहरपंत** : हीं तुमचीं कामं ऐन वेळेलाच कशीं उद्भवतात कोण जाणे ?

**लक्ष्मीबाई** : अहो, ही सनातन्यांशीं लग्न लावायला तयार आहे बरं का ! सात जन्म तपश्चर्या केली तरी असा वर मिळायचा नाहीं, असं ही म्हणत होती.

**नलिनी** : ऊं ! तें खोटं होतं.

**हरिहरपंत** : मग काय, तुझा विचार तरी काय आहे ?

**लक्ष्मीबाई** : त्या गुंडाच्या गळ्यांत गळा घालायचा विचार असेल !

**नलिनी** : मला सनातन्यांशीं लग्न लावायचं नाहीं; नि श्रीनिवासशींही विवाहबद्ध व्हायचं नाहीं.

**लक्ष्मीबाई** : शांतारामाच्या चाळींतल्या शांतारामपंतांशीं तरी...

**नलिनी** : त्यांच्याशीं नाहीं; कुणाशीं नाहीं. मी आजन्म अविवाहित राहाणार.

**हरिहरपंत** : अन्याऱ्या ! हें आणखी एक वेड तुझ्या डोक्यांत कुठून शिरलं ?

**लक्ष्मीबाई** : लग्न न करतां मुरळी का व्हायचं आहे तुला ?

**हरिहरपंत** : आज लग्न करायचं नाहीं म्हणशील आणि उद्यां तुझ्या मैत्रिणींचे थाटलेले संसार आणि त्यांच्या अंगाखांद्यावरचं बघितलंस, म्हणजे तुला पश्चात्ताप होईल.

**नलिनी** : अंगाखांद्यावरचं पाहून पश्चात्ताप व्हायला, मला दागिन्यांचा मुळींच सोस नाहीं.

**हरिहरपंत** : अग, अंगाखांद्यावरचं—म्हणजे सोन्यामोत्यांचे दागिने नव्हत, तर चालते बोलते अलंकार ! ते दुडुदुडु धावणारे अलंकार मिळाल्याशिवाय स्त्रीच्या जन्माचं साफल्य होत नाहीं.

**लक्ष्मीबाई** : खरं म्हणतां तुम्हीं ! ते अलंकार, ते दंगामस्ती करणारे छोटेछोटे जीव नसतील तर स्त्रीला एकलेपणा विशेष जाणवतो. स्वानुभवावरून सांगतें मी ! आणि एकदा का तुझी तिशी उलटली...

**हरिहरपंत** : अन् बत्तिशी पार पडली...

**लक्ष्मीबाई** : म्हणजे एकलेपणा असह्यच होतो.

**हरिहरपंत** : तोंडाचं बोळकं झालेल्या पुष्कळ कुमारिकांनीं, आयुष्याच्या उत्तरार्धांत लग्नं केलेलीं आहेत. त्यांच्यापासून धडा घे. नलूताई धडा घे !

**नलिनी** : घडा घेत नाहीं नि पासरीही घेत नाहीं. माझा एकदा निश्चय झाला तो कायम.

**हरिहरपंत** : [ कपाळावर हात मारून ] दुर्दैव आमचं ! आतां तो सनातने आला आणि त्यानें मुलगी पसंत आहे असं सांगितलें म्हणजे मी काय करूं ? कालच्या त्याच्या वर्तनावरून त्याला मुलगी पसंत पडणार असंच वाटतं ! त्याला मुलगी नापसंत होईल तर काय बहार होईल ! बजरंगा, सनातन्याला तुझ्यासारखाच ब्रह्मचारी राहाण्याची सद्‌बुद्धि दे बाबा !

**लक्ष्मीबाई** : 'आम्हीं तुला मुलगी देत नाहीं' असं त्याला सांगितलं तर ?

**हरिहरपंत** : तर तो माझ्या मिशांना कांदे बांधील नि तुझ्या झिंज्या उपटील.

**लक्ष्मीबाई** : अहो, तो सनातने आला, म्हणजे गोड गोड बोलून श्रीनिवासला इथें बोलावून आणूं. चांगला गुंड आहे तो. देऊं त्याला सनातन्याच्या अंगावर सोडून. त्याला नळू देण्याचं आमिष दाखवलं म्हणजे झालं !

**हरिहरपंत** : आणि ही सगळी सुंदोपसुंदी इथें व्हायची ! छान उपाय. त्यांत तुझ्या इच्छेप्रमाणें श्रीनिवास विजयी झाला, तर त्याला नलिनी द्यावी लागेल ना ? बस बस ! असंच करूं ! काय ग ? तुला श्रीनिवासशीं तरी कुठें लग्न करायचं आहे ? त्याच्याविरुद्ध तूं साक्ष देशीलच ! तो जर विजयी झाला तर, त्यानें अनधिकृतपणानें माझ्या घराला किल्ली चालवली असा त्याच्यावर आरोप करून त्याला पोलिसांकडून धमकी देववतों आणि चाळीच्या भय्याकडून त्याला मुळीं चाळीबाहेर घालवून देतों [ श्रीनिवास सनातन्याच्या वेषांत प्रवेश करतो ] आलांत आपण ? बसा हवेतर खुर्चीवर. इथें घोडंबिडं कांहींएक मिळायचं नाहीं.

**श्रीनिवास** : इथें घोडं कशाला हवं ? आपण एकदम वरातींतच घोडं आणूं. पंतप्रतिनिधि–नव्हे पंत, तुमची मुलगी मला पसंत आहे.

**हरिहरपंत** : आमची कालची नलिनी तुम्हांला पसंत पडली; पण आजची नलिनी पसंत आहे का ?

**श्रीनिवास** : हा काय प्रकार आहे ?

**हरिहरपंत** : [ नलिनीकडे बोट दाखवून ] हा असा प्रकार आहे.

**श्रीनिवास** : ह्या कोण ? आपण सिनेमानटी आहांत काय ?

**लक्ष्मीबाई** : अहो, ही सिनेमानटी नाहीं. ही आमची नलिनी, ऊर्फ नलू.

**श्रीनिवास** : ह्यांचा कालचा पेहेराव...

**हरिहरपंत** : म्हाळसेसारखा होता. आजचा हा असा आहे. अन् हाच नेहमींचा आहे.

**श्रीनिवास** : तर मग ही मुलगी...

**हरिहरपंत** : तुम्हांला नाहीं पसंत पडायची. हिच्या एकेक खोड्या तुम्हांला सांगितल्या तर तुम्हीं आश्चर्यचकित व्हाल. अहो ही आपल्या वडिलांचा उपमर्द करते.

**श्रीनिवास** : स्पष्टवक्ती आहे म्हणाना !

**हरिहरपंत** : आपल्या आईला फडाफड उलटून बोलते.

**श्रीनिवास** : आई सावत्र आहे. सावत्र आई म्हणजे भांडणाची पेटलेली खाई. हें असं चालायचंच.

**हरिहरपंत** : ही नाटक-सिनेमा पाहायला जाते.

**श्रीनिवास** : आपल्या नेत्रकर्णादि इंद्रियांचा योग्य उपयोग करते.

**हरिहरपंत** : अश्लील कादंबऱ्या वाचते.

**श्रीनिवास** : आपल्या ज्ञानांत भर टाकते.

**हरिहरपंत** : हॉटेलांत जाऊन चहा ढोसते...

**श्रीनिवास** : घरांत सावत्र आई असल्यामुळें न शमलेली तहान बाहेर भागवते.

**हरिहरपंत** : तें सुद्धा हिंदूच्या हॉटेलांत नव्हे. अस्सल इराण्याच्या.

**श्रीनिवास** : मुलगी फार पुरोगामी आहे. वाहवा ! वाहवा !

**हरिहरपंत** : इतकं ऐकून सुद्धा ही मुलगी तुम्हीं नापसंत करीत नाहीं ?

**श्रीनिवास** : ह्या मुलीला चौफेर ज्ञान आहे. मला शेंकडा शंभर टक्के पसंत आहे ही.

**हरिहरपंत** : तर मग पुढें ऐका. तिला इथें ठेवून, ह्या नि त्या दाराला आंतून आणि ह्या दाराला बाहेरून एवढीं मोठीं कुलपं जरी लावलीं, तरी सुद्धा ही शेजारीं राहाणाऱ्या गुंडाच्या खोलींत, रात्रीं अपरात्रीं, आमचा डोळा चुकवून वारंवार जाते.

**श्रीनिवास** : अहाहा ! श्रीशिवाजी महाराज औरंगजेबाच्या कैदखान्यांतून आग्ऱ्याहून असेच निसटले. ही मुलगी सुध्दा, तुमच्या हातावर तुरी देऊन, वाटाण्याच्या अक्षता देण्यासाठीं तशीच निसटते. वा वा ! काय ही प्रचंड बुद्धिमत्ता ! अशा मुलीशीं मी आत्तां सुद्धा लग्न करायला तयार आहें.

**नलिनी** : पण मी तुमच्याशीं लग्न करायला तयार नाहीं.

**श्रीनिवास** : कां हो ?

**नलिनी** : सनातने, मी तुम्हांला निक्षून सांगतें, प्राण गेला तरी मी तुमच्या ह्या जंगलांत प्रवेश करणार नाहीं.

**श्रीनिवास** : कां हो पंत ?

**हरिहरपंत** : काय आहे तें तुम्हींच पाहा.

**श्रीनिवास** : मला प्रथम मुलगी देण्याचं कबूल केलंत. मुलगी मला पसंत पडली म्हणून मी लग्नाची तयारीही केली आज. कार्यस्थळ ठरवलं. कापडचोपड खरेदी केलं. दागदागिन्यांची ऑर्डर दिली. मी ब्रह्मचर्याश्रमांतून गृहस्थाश्रमांत यायचा म्हणून न्हाव्याला सुद्धा बोलावून ठेवला. इतकं झाल्यावर मुलगी देण्याचं नाकारतां ? माझी द्रव्याची नि अब्रूची नुकसानी करतां काय ? मला मुलगी देतां का मी पोलिसांत वर्दी देऊं ? तुम्हांला तुमच्या करड्या केसांची अब्रू राखायची आहे कीं नाहीं ?

**हरिहरपंत** : ह्यांचेकडील द्रव्याचे नि वस्त्रप्रावरणांचे डोंगर लक्षांत आण आणि माझे आई, यांच्याशीं लग्न लावायला तयार हो.

**नलिनी** : पण बाबा, माझं लग्न झालं आहे.

**हरिहरपंत** : हो का ? केव्हां ? कुणाशीं ?

**नलिनी** : म्हणजे उद्यां होणार आहे, त्या श्रीनिवासशीं. माझं त्यांच्यावर प्रेम आहे.

**श्रीनिवास** : पंत पंत, काय चाल्लं आहे हें ? देऊं मी पोलिसांत वर्दी ?

**हरिहरपंत** : नका हो देऊं !

**श्रीनिवास** : तर मग मला मुलगी द्या ! नाहींतर हा सनातने चाल्ला.

**हरिहरपंत** : हें पाहा सनातने, असे रागावूं नका. अशा प्रसंगीं मी तरी काय करूं हो ?

**श्रीनिवास** : आपली मुलगी मला द्या.

**नलिनी** : बाबा, तुम्हीं ह्यांच्याशीं माझं लग्न लावलंत, तर मी त्यांच्या उंबरठ्या-वरच डोकं फोडून प्राण देईन.

**हरिहरपंत** : सनातने, मी तुम्हांला मुलगी न देतां नुकसानभरपाई देतों.

**श्रीनिवास** : किती रक्कम द्याल ?

**हरिहरपंत** : आपली उडी केवढी आहे ?

**श्रीनिवास** : माझी वाघाची उडी आहे. नुकसान भरपाई म्हणून कमींतकमी रोख बारा हजार रुपये पाहिजेत मला.

**हरिहरपंत** : जय बजरंग ! अहो श्रीनिवास, धांवा हो धांवा ! हा सनातन्या पाहा तुमच्या नलिनीला घेऊन चालला.

**लक्ष्मीबाई** : श्रीनिवास त्वरा करा, नाहींपेक्षां नलू तुमच्या हातची गेलीच ! ह्या सनातन्याचे पांच पाट काढून, त्याला वाटेला लावा; निकाल लावा हो त्याचा.

**श्रीनिवास** : श्रीनिवास म्हणजे शेजारचा गुंड ! कोण कुणाचा निकाल लावतो तें थोड्याच वेळांत तुम्हांला दाखवतो. हॅट् ! दणका देतों त्याला [ आपल्या ब्लॉक-मध्यें येऊन ] तूं श्रीनिवास ? माझ्या वधूवर तुझा डोळा ? [ नेहमींच्या आवा-जांत ] डोळा न ठेवायला तिचं लग्न थोडंच झालेलं आहे ? ती माझी नि मी तिचा. [ सनातनेच्या आवाजांत ] ती कुणाची हें आपण द्वंद्वयुध्दानेंच ठरवूं या. [ दंड थोपटतो; आरडा ओरड करतो ] मर; मर, श्रीनिवास, मर आपल्या प्रेयसी-साठीं. [ मारामारी सुरू होते ]

**नलिनी** : मी जावें श्रीच्या मदतीला. [ नलिनी जाऊं लागते. पंत व लक्ष्मीबाई तिला धरून ठेवतात. ]

**श्रीनिवास** : [ नेहमींच्या आवाजांत ] मेलों मेलों. [ सनातनेच्या आवाजांत ] पुरे ? पुरे ? [ पंत हसतात ] नलिनी हवी काय? ही घे नलिनी ! [ गादी झोडपतो ] घे ! [ नेहमींच्या आवाजांत. आतां नाहीं माझ्यानें धीर धरवत. मरतो मी ! [ पडल्याचा आवाज करतो. इकडे नलिनी बेशुद्ध पडते. श्रीनिवास पंतांकडे येतो ] निकाल लावला त्या श्रीनिवासचा [ पंत व लक्ष्मीबाई हताश

होतात. बेशुद्ध पडलेल्या नलिनीला पाहून ] नलू, नलू, शुद्धीवर ये. अरे बघतां काय ? कुणी तरी पाणी घेऊन या. [ लक्ष्मीबाई पाणी आणून नलिनीच्या तोंडावर शिंपडते. नलिनी शुद्धीवर येते. परंतु सनातन्याला पाहातांच किंचाळी मारून पुन्हा बेशुद्ध पडते. [ श्रीनिवास नेहमींच्या आवाजांत ] नलू माझ्याकडे पाहा. ओळखलं नाहींस का मला ? मी, मी तो श्रीनिवास. [ श्रीनिवास दाढीमिशा व डोक्याचा फेटा काढतो. नलिनी हसूं लागते. पंत संतापतात ]

**हरिहरपंत** : अरे धटिंगणा ! तूं का तो ? बरा सापडलास माझ्या कचाट्यांत. अग जा. नाक्यावरच्या पोलिसाला बोलावून आण.

**लक्ष्मीबाई** : मी रात्रीची रस्ते चुकतें. आपणच जा.

**हरिहरपंत** : हा तेवढ्यांत पळून गेला तर ?

**लक्ष्मीबाई** : पळून जातो आहे ! बांधून ठेवीन त्याला इथें !

**हरिहरपंत** : तुला आवरेल का तो ?

**लक्ष्मीबाई** : [ पदर कसून ] कशी झालें तरी खेडेगांवांतली मुलगी आहें मी; चांगली दणकट. [ पंत जाऊं लागतात ]

**श्रीनिवास** : पंत, तुम्हीं निर्धास्तपणानें जा. मी कुठेंही पळून जात नाहीं. आणि गेलोंच तर तुमच्या मुलीला बरोबर घेऊनच जाईन !

**लक्ष्मीबाई** : पाहातां काय ? तुम्हीं बजरंगाचं नांव घ्या आणि जा !

**श्रीनिवास** : पंत, तुम्हीं जाच ठाण्यावर. नि त्या पोलिसाला, हें तुमच्या मुलीच्या सहीचं मला आलेलं एवढं पत्रही दाखवा. जा.

[ पत्र पंतांना देतो. ते वाचूं लागतात ]

**नलिनी** : बाबा चष्मा देऊं का ?

**हरिहरपंत** : कांहीं नको. माझी दृष्टि चांगली स्वच्छ झाली आहे.

**श्रीनिवास** : म्हणे पोलिसांत जातों. कुणाला देतां ह्या धमक्या ? अं ?

**लक्ष्मीबाई** : काय लिहिलं आहे हो पत्रांत ?

**हरिहरपंत** : डांबल तुझं नि माझं !

**लक्ष्मीबाई** : म्हणजे काय बाई ?

**हरिहरपंत** : ह्याच्यांत असा मजकूर आहे कीं त्यामुळें पोलिसाचा बाप जरी आला तरी ह्याचं कांहींएक वाकडं होणार नाहीं. कार्टे तुम्हीं एवढीं शेजारींपाजारी असतांना ह्याला पत्र पाठवून लिखाणांत कशाला गुंतलीस ?

**लक्ष्मीबाई** : लिखाणांत गुंतली का ? आणा तें पत्र इकडे [ पत्र फाडून खातें ] जा आतां पोलिसांत फिर्याद करा.

**श्रीनिवास** : तें पत्र जरीं तुम्हीं खाल्लंत तरी मुळींच चिंता नाहीं. मला हिचीं असलीं सतराशेंसाठ पत्रं आलेलीं आहेत.

**नलिनी** : हो. मीं पाठवलीं आहेत.

**श्रीनिवास** : मी तीं सगळीं फाईल करून ठेवलीं आहेत.

**नलिनी** : त्यांतलीं बरींच रजिस्टर्ड आहेत.

**श्रीनिवास** : शिवाय हिचे आणि माझे एकत्र काढलेले निरनिराळ्या पोझिशनचे अनेक फोटो आहेत माझ्याजवळ.

**नलिनी** : ह्यांच्याकडे त्या फोटोंचा तयार केलेला एक मोठा आल्बमच आहे टेबलाच्या ड्रॉवरमध्यें.

**श्रीनिवास** : परवां आपला हातांत हात घालून काढलेला फोटो फार सुंदर निघाला आहे बरं का ! आपण ब्लॉक करून घेऊं त्याचा.

**हरिहरपंत** : तें सगळं ठीक आहे. आतां पुढं तुझं काय म्हणणं आहे ?

**श्रीनिवास** : दुसरं कांहीं नाहीं ! ज्या ज्या ठिकाणीं आपण आपल्या मुलीचं लग्न ठरवायला जाल त्या त्या ठिकाणीं आमचा एकत्र काढलेला एक फोटो आणि हिचं मला आलेलं एक पत्र हीं रजिस्टर करून पाठवून देईन.

**नलिनी** : मग मला माळ घालायला कोण तयार होतो तें पाहूं या !

**श्रीनिवास** : तेव्हां निमूटपणानें आपली मुलगी मला द्या.

**नलिनी** : माझं ह्यांच्याशीं सरळपणानें लग्न लावा.

**हरिहरपंत** : काय ग ? आतां काय करायचं ?

**लक्ष्मीबाई** : माझं डोकं मुळींच चालत नाहींसं झालं ! समजा, ह्याला नाहीं मुलगी दिली तर ?

**हरिहरपंत** : तर ? ही वयांत आलेली असल्यामुळें वकीलसाहेबांसारखीच माझी सुद्धा स्थिति होईल.

**लक्ष्मीबाई** : ह्याला मुलगी द्यायला तशी हरकत नाहीं. पण ह्यानें डल्ला मारला आहे ना ?

**हरिहरपंत** : छे छे ! जाणून बुजून चोराला जांवई कसा करायचा ?

**नलिनी** : श्रीनिवास, आपण रजिस्टर लग्न करायचं बरं का ! खर्च कमी येतो त्याला.

**श्रीनिवास** : आणि जास्त खर्च करायला पैसा आहे कुणा लेकाजवळ ?

**हरिहरपंत** : तुमचे बॅंकेंत पैसे नाहींत ?

**श्रीनिवास** : एक पै सुद्धा नाहीं.

**हरिहरपंत** : मग परवांच्या रात्रींचे ते रोकड पन्नास हजार ?

**श्रीनिवास** : आपण श्रीमंत आहोंत असं दाखवण्यासाठीं मी खोटं बोल्लों होतों.

**हरिहरपंत** : तुमची बॅंकेंतली नोकरी अद्याप कायम आहे तर ?

**श्रीनिवास** : तुम्हीं स्वतः जाऊन वाटेल त्या गोष्टी सांगितल्या डायरेक्टरांना ! पण प्रत्यक्ष तपासणी करतां कांहींच अफरातफर आढळली नाहीं त्यांना. उलट माझं सर्व काम अपटुडेट असल्यामुळें त्यांनीं मला खूप होऊन दहा रुपये विशेष वाढ दिली आणि वरची ग्रेड मिळाली मला.

**हरिहरपंत** : वा वा ! मग असला जांवई कोणता गाढव नापसंत करणार ! का हो, हें तरी खरं आहे का ?

**श्रीनिवास** : आपल्या गळ्याशपथ !

**हरिहरपंत** : काय ग, तुला पसंत आहे ना हा जांवई ?

**लक्ष्मीबाई** : अहो, असा जांवई मिळायला भाग्य लागतं भाग्य !

**नलिनी** : पण हे गुंड आहेत.

**हरिहरपंत** : असल्या धकाधकीच्या काळांत असला तगडा मनुष्यच टिकाव धरील.

**नलिनी** : जंटलमन डाकू आहेत हे !

**हरिहरपंत** : डाकूगिरी केल्याशिवाय जगांत चालतच नाहीं मुळीं. बोलूं नको तूं ! मला हा जांवई पसंत आहे. तुला विचारतो कोण ? अग किती वाजले बरं ?

**लक्ष्मीबाई** : दहाला एक मिनिट कमी आहे.

**हरिहरपंत** : आतांच सुमुहूर्त आहे. ये ये नलू. आतां तुमचा हस्तसंयोग करतों आणि नंतर कचेरींत जाऊन लग्न रजिस्टर करतों.

**लक्ष्मीबाई** : •इश्श ! रजिस्टर लग्न ? त्या पेक्षां...

**हरिहरपंत** : अग गप ! त्याला कमी खर्च येतो.

**लक्ष्मीबाई** : बाई बाई ! [ पंत नलिनीचा हात श्रीनिवासच्या हातांत देतात. लक्ष्मीबाई मधला दरवाजा उघडते ] नलू, तुम्हा दोघांचं लग्न व्हायला कारण झालेला हा मधला दरवाजा आतां निर्धास्तपणानें उघडा ठेवायचा बरं का !

**नलिनी** : पण माई, नेहमीं नाहीं हं उघडा ठेवायचा.

[ श्रीनिवास आपल्या ब्लॉकमध्यें जातो.
त्याच्या मागोमाग नलिनी जाते. ]

**लक्ष्मीबाई** : अग अग, बाकीचे विधी राहोत मेले. निदान नांव तरी घे.

**हरिहरपंत** : शिकवा आतां तिला सगळं !

**नलिनी** : मला बाई लाज वाटते.

**लक्ष्मीबाई** : हं पुरे पुरे !

**नलिनी** : माई, ऐका हं. समोरच्या कोनाड्यांत भाकरीचे तुकडे, श्री आणि मी इकडे आणि तुम्ही तिकडे. [ दार लावते, सर्व हसतात ]

**श्रीनिवास** : नलू, आतां जरा गंमत करतों हं ! [ आपल्या हाताचं मोठ्यानें चुंबन घेतो ]

**लक्ष्मीबाई** : [ ऐकून ] ऐका, ऐका, आपल्या बायकोला कशी खूष ठेवावी तें जांवयापासून तरी शिका. [ नलिनी खदखदां हसते ]

**हरिहरपंत** : [ खुर्चीवर बसून ] काय शिका ? शिका काय ? नवऱ्याला कसा खूष ठेवावा हें लेकीपासून तूंच शीक प्रथम. [ श्रीनिवास पुन्हा हाताचें चुंबन घेतो. ] आपल्याला जांवई पण जांवई मिळाला बरं का ! [ पंत लक्ष्मीबाईचा मुका घेऊं जातात ]

**लक्ष्मीबाई** : इश्श ! [ लक्ष्मीबाई आंतल्या खोलींत जाते. तिच्या मागोमाग पंत जाऊं लागतात ]

पडदा पडतो.

श्रीकृष्णार्पणमस्तु ।

ज्यांचीं राजकीय भविष्यें
तंतोतंत खरीं ठरलीं
त्या वीर सावरकरांचे
तेजस्वी मराठी ग्रंथ—

| | |
|---|---|
| १८५७ चें स्वातंत्र्यसमर | रु. १२॥ |
| हिन्दुराष्ट्र-दर्शन | ६ |
| हिन्दुपदपातशाही | ५ |
| हिन्दुत्वाचे पंचप्राण | ३ |
| हिन्दुत्व | २॥ |
| तेजस्वी तारे | २ |
| सिंहगड | -॥- |
| बाजी प्रभु | -॥- |
| रानफुलें | २ |
| चाफेकर-रानडे | -।= |

---

प्राप्ति-स्थळ | ग. पां. परचुरे-प्रकाशन-मन्दिर
गोरेगांवकर चाळ क्र. २, गिरगांव, मुंबई ४

---